**<u>नागपूर महानगरपालिका</u>**
**अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील अधिकारी / कर्मचारी (वर्गीकरण, सेवाभरती व पदोन्नती) नियमांना शासन मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. नामपा-२०१५/१६५२/प्र.क्र.१६६/नवि-२६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १२ मे, २०१७

**<u>वाचा</u>** :- १) शासन परिपत्रक क्र.ठामपा-२००२/८२१/प्र.क्र.८६/नवि-२३, दि.०२/०७/२००८ व त्यासोबतचे महानगरपालिकेमधील अधिकारी/कर्मचारी यांचे मॉडेल सेवा (सेवाभरती व सेवांचे वर्गीकरण) नियम, २००८
२) शासन निर्णय क्र.नामपा-२०१६/प्र.क्र.१८/नवि-२६, दिनांक ०३/०५/२०१६
३) आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांचे पत्र क्र.१५९/आस्थापना दि.२८/०९/२०१५, पत्र क्र.३४६/एम.सी. दिनांक २८/३/२०१६ चे पत्र व पत्र क्र.२५/४/२०१६ व त्यासोबतचा ठराव क्र.२५३ दिनांक १८/०४/२०१६ आणि सेवाप्रवेश नियमावली.
४) संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, सांताक्रूज (पूर्व), कलिना, मुंबई यांचे पत्र क्र.मअसे/२०१६/३२-एफ/१२३९ दिनांक १७/०९/२०१६
५) संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, सांताक्रूज (पूर्व), कलिना, मुंबई यांचे पत्र क्र.मअसे/२०१६/६५/१३०५ दिनांक २९/०९/२०१६

**<u>प्रस्तावना :-</u>**

नागपूर शहराचे मोठ्या प्रमाणात होत असलेले नागरीकरण व होत असलेला विस्तार पहाता, शहरामध्ये गगनचुंबी इमारती, मोठ्या वसाहती, गर्दीच्या बाजारपेठा, मॉल्स, हॉटेल्स, कॉलेजेस, शाळा, स्मॉल स्केल इंडस्ट्रिज, मिहान, पेट्रोल पंप, एलपीजी बॉटलिंग प्लॉन्ट इ. अस्तित्वात आल्या आहेत. त्यामुळे दुर्घटनांचे प्रमाणसुध्दा वाढलेले आहे. तसेच राज्य शासनातर्फे नागपूर शहराची स्मार्ट सिटी मिशन अंतर्गत निवड झालेली आहे. अशा परिस्थितीत नागपूर महानगरपालिकेच्या अग्निशमन विभागाचे समर्थपणे कार्य करण्यासाठी बळकटीकरण व विस्तार करणे गरजेचे आहे. या अनुषंगाने उक्त संदर्भाधीन क्र.०२ येथील शासन निर्णयान्वये नागपूर महानगरपालिकेच्या अग्निशमन व सेवा विभागाच्या आकृतीबंधास मान्यता दिलेली आहे.

राज्यातील विविध महानगरपालिकांनी सेवा प्रवेश नियम तयार केले नसल्याने महानगरपालिकांमधील कर्मचारी / अधिकारी यांच्या सेवा प्रवेश नियमासंदर्भात न्यायालयीन दाव्यात मा.उच्च न्यायालयाकडून वारंवार विचारणा होत होती. तसेच विधीमंडळ समित्यांनी देखील सेवा प्रवेश नियम लवकरात लवकर करण्याचे दृष्टीने अनेकवेळा शिफारस केली आहे. महानगरपालिकेतील अधिकारी/ कर्मचारी यांच्यासाठी स्वतंत्र सेवा प्रवेश नियम अस्तित्वात असणे आवश्यक होते. म्हणून शासनाने महानगरपालिका अधिकारी / कर्मचारी यांचे मॉडल सेवाप्रवेश नियम तयार करुन त्याची प्रत शासन परिपत्रक क्र. ठामपा-२००२/८२१/प्र.क्र.८६/नवि-२३, दि.०२ जुलै, २००८ नुसार सर्व महानगरपालिकांना पाठविली होती. मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ४५७

(३) नुसार ज्या जागांवर नेमणूक करण्याचा अधिकार महानगरपालिकेमध्ये विहित असेल त्या जागांसाठी आवश्यक असलेली अर्हता आणि त्या जागांवर नेमणूक करण्याची पध्दती याबाबत नियम करणे आवश्यक होते. त्यानुसार महानगरपालिकांच्या कर्मचारी / अधिकारी यांचे नमुना सेवा प्रवेश नियम तयार करण्यासंदर्भात कालबध्द कार्यक्रम शासनाने दिनांक ०२/०७/२००८ च्या परिपत्रकान्वये सर्व संबंधितांना कळविला होता. त्यास अनुसरुन नागपूर महानगरपालिका ठराव क्र.२५३ दिनांक १८/०४/२०१६ अन्वये मंजुरी घेऊन महानगरपालिकेने संदर्भ क्र.०३ येथील पत्रान्वये शासनाच्या अंतिम मान्यतेसाठी सादर केले आहेत. त्यानुसार प्रकरणी संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, मुंबई यांनी संदर्भाधीन क्र.०४ व ०५ अन्वये सुचविलेल्या शिफारशी नुसार, नागपूर महानगरपालिकेच्या अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागाच्या सेवाप्रवेश नियमास शासनाची मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ४५७ (३) नुसार नागपूर महानगरपालिकेने शासन मान्यतेस्तव सादर केलेले " नागपूर महानगरपालिका, अग्निशमन व आणिबाणी सेवा विभाग (सेवा भरती व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०१७" यांचा विचार करुन त्यात आवश्यक त्या सुधारणा करुन **सोबत जोडलेल्या नियमावलीस आणि त्यासोबतच्या विनियमास** महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ४५४, ४५५ व ४६५ (१) (ल) अन्वये प्राप्त अधिकारात, या आदेशाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** या नियमावलीस " नागपूर महानगरपालिका, अग्निशमन व आणिबाणी सेवा विभाग (सेवा भरती व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०१७" असे संबोधण्यात यावे.

**०३.** सदर नियमावली आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांनी तात्काळ शासन राजपत्रात प्रसिध्द करावी. हे नियम शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

**०४.** या आदेशानुषंगीक सर्व सांविधानिक बाबींची पूर्तता आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांनी करावयाची आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०५१२१७१८२६२७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.05.12 17:20:34 +05'30'

**( ज.ना.पाटील )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.
५) संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, सांताक्रूज (पूर्व), कलिना, मुंबई
६) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

## नागपूर महानगरपालिका, नागपूर

## अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील अधिकारी / कर्मचारी

## (वर्गीकरण, सेवाभरती व पदोन्नती)

## विनियम - २०१७

१. संक्षिप्त शिर्षक व लागू होण्याचा दिवस :-

या विनियमांना "नागपूर महानगरपालिका, नागपूर अग्निशमन विभागातील अधिकारी / कर्मचारी (वर्गीकरण, सेवाभरती व पदोन्नती) विनियम २०१७" असे संबोधण्यात यावे.

२. व्याख्या :-

या विनियमात संदर्भानुसार दुसरा अर्थ अपेक्षित नसेल तर :-

क) "महानगरपालिका" म्हणजे नागपूर महानगरपालिका.

ख) "अधिनियम" म्हणजे महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम

ग) "शासन" म्हणजे महाराष्ट्र शासन.

घ) "महापौर" म्हणजे नागपूर महानगरपालिकाचे महापौर.

च) "नियुक्ती प्राधिकारी" म्हणजे अधिकारी / कर्मचारी गट "अ" ते गट "ड" यांच्या संदर्भात "आयुक्त" असा आहे.

छ) "आयुक्त" म्हणजे अधिनियमातील कलम ३६ अन्वये शासनाने नियुक्त केलेला अधिकारी.

ज) "निवड प्राधिकारी" म्हणजे या विनियामातील जोडपत्र - १ मधील परिच्छेद क्र.१ मध्ये विनिर्दिष्टीत केलेली कर्मचारी निवड समिती.

झ) "सक्षम प्राधिकारी" याचा अर्थ नागपूर महानगरपालिकेचे आयुक्त असा होतो.

ट) "कर्मचारी" म्हणजे महाराष्ट्र महानगरपालिका अधिनिमय मधील प्रकरण ४, कलम ५१ पोटकलम (४) अन्वये नेमणूक केलेला कोणताही एक अधिकारी व कर्मचारी परंतु यात रोजंदारीवर, हजेरीपटावर असलेले कामगार आणि कंत्राटी पध्दतीने तसेच अंशकालीन व मानद स्वरुपी नेमण्यात आलेल्या व्यक्तींचा समावेश होत नाही.

ठ) "संवर्ग" म्हणजे स्वतंत्र घटक म्हणून मंजूर केलेली एखद्या सेवेतील किंवा एखाद्या सेवेच्या विभागतील पदसंख्या.

ड) "कलम" म्हणजे अधिनियमाचे कलम.

ढ) "परिशिष्ट" म्हणजे या विनियमांना जोडलेले परिशिष्ट.

ण) "जोडपत्र" म्हणजे या विनियमांचे शेवटी जोडलेले जोडपत्रे.

त) "अनुसूची" म्हणजे या विनियमांच्या जोडपत्र -२ ला जोडण्यात आलेली अनुसूची.

थ) "विभागीय परिक्षा" म्हणजे नागपूर महानगरपालिका अग्निषमन विभागातील आस्थापनेवरील अधिकारी व कर्मचारी यांच्यासाठी विहित करण्यात आलेली व या विनियमांच्या जोडपत्र - २ अनुसूची "अ" मध्ये नमूद करण्यात आलेली विभागीय परिक्षा.

द) "पदवी" म्हणजे संसदेच्या अधिनियमाद्वारे किंवा भारतातील राज्य विधिमंडळाद्वारे विधी संस्थापित असलेले कोणतेही विद्यापीठ किंवा संसदेच्या अधिनियमाद्वारे किंवा तत्सम अधिनियमाद्वारे स्थाना करण्यात आलेल्या कोणत्याही शैक्षणिक संस्थेतून प्राप्त केलेली पदवी.

ध) "पदविका" म्हणजे संसदेच्या अधिनियमाद्वारे किंवा भारतातील राज्य विधिमंडळाद्वारे विधी संस्थापीत असलेले कोणतेही विद्यापीठ किंवा तंत्र शिक्षण मंडळ किंवा संसदेच्या अधिनियमाद्वारे किंवा तत्सम अधिनियमाद्वारे स्थापना करण्यात आलेल्या कोणत्याही शैक्षणिक संस्थेतून तंत्र निकेतनातून प्राप्त केलेली पदविका.

न) “व्यावसायिक अर्हता” Professional Qualification म्हणजे, अग्निशमन अभियांत्रिकी पदवी (बी.ई.फायर) अग्निशमन अभियांत्रिकी उच्च शिक्षा पदविका (ॲडव्हान्स इन फायर इंजिनियरिंग), अग्निशमन अभियांत्रिकी पदविका, (डिप्लोमा इन फायर इंजिनियरिंग) उप अग्निशमन अधिकारी हे पाठ्यक्रम [राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर किंवा राज्य अग्निशमन प्रशिक्षण अकादमी, मुंबई मधुन उत्तीर्ण झालेले अथवा इंस्टीट्यूट ऑफ फायर इंजिनिअर्स यूके / इंडिया या संस्थेमधून एम.आय. (फायर) किंवा ग्रेड (I) (फायर) उत्तीर्ण झालेले]

प) “स्वीयेतर सेवा” (Foreign Service) म्हणजे ज्या सेवेत नागपूर महानगरपालिका नागपूर, अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील कर्मचाऱ्याला त्यांचे वेतन व भत्ते महानगरपालिकेच्या निधी व्यतिरीक्त अन्य कोणत्याही साधानाद्वारे मिळतात अशी सेवा.

फ) “मुलाखत” म्हणजे याचा अर्थ, नागपूर महानगरपालिका नागपूर, अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागामध्ये असलेल्या पदावरील / पदांवरील नियुक्तीकरीता अर्ज केलेल्या उमेदवाराची सक्षम निवड प्राधिकाऱ्याने किंवा त्याच्या स्वत:च्या सदस्यांमधून अशा प्राधिकरणाने नामनिर्देशित केलेल्या एखाद्या समितीने आणि ज्या पदांकरिता त्यांने किंवा तिने अर्ज केला आहे त्या पदांवरील नियुक्तीकरिता निवड करण्यासाठी अशा रितीने मुलाखत घेण्यात आलेल्या उमेदवारांची योग्यता किंवा अन्यथा मूल्यमापन करण्याच्या उद्देशाने आणि अशा मुलाखत घेण्यात आलेल्या उमेदवारांना मिळालेल्या गुणांच्या आधारे अनुक्रम लावण्यासाठी घेतलेली मुलाखत, असा आहे.

ब) “समतुल्य / समकक्ष अर्हता” म्हणजे, संबंधित अर्हतेला समान म्हणून शासनाकडून जाहीर केलेली अर्हता असे आहे आणि याबाबत कोणताही संदेह / वाद उद्भवल्यास शासनाचा निर्णय अंतिम असेल.

भ) “मान्यताप्राप्त शैक्षणिक संस्था” म्हणजे, शासनाची मान्यता असलेली संस्था असे आहे.

म) “माध्यमिक व उच्च माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा” म्हणजे, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाकडून घेण्यात येत असलेली शालांत प्रमाणपत्र परिक्षा असे आहे आणि यात शासनाने या परिक्षेशी समान म्हणून जाहीर केलेल्या कोणत्याही इतर परिक्षेचा समावेश आहे.

य) औद्योगिक प्रशिक्षण संस्था म्हणजे राज्य शासनाने विविध प्रकारच्या औद्योगिक व्यवसायाचे प्रशिक्षण देण्यासाठी शासनाने तयार केलेले औद्योगिक प्रशिक्षण केंद्र.

र) “समय श्रेणी वेतन” म्हणजे असे वेतन जे, या विनियमात घालून देण्यात आलेल्या कोणत्याही शर्तीच्या अधिन किमान पासून कमाल पर्यंत नियतकालिक वेतनवाढीने वाढते.

ल) “लेखी परीक्षा” म्हणजे नागपूर महानगरपालिका नागपूर, अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागाकडून योग्य रितीने नामनिर्देशित करण्यात आलेल्या एखाद्या अभिरणाकडून, पदाकरिता अर्ज करणाऱ्या उमेदवारांच्या योग्यतेचे किंवा अन्यथा मूल्यमापन करण्याच्या प्रयोजनाकरिता, घेतलेली परीक्षा आणि त्या लेखी परीक्षेतील उमेदवारांच्या कामगिरीचा संबंध असेल तेथवर त्यांच्या गुणवत्तेचा क्रम लावण्याच्या उद्देशाने घेतलेली परीक्षा असा आहे.

ळ) व्यावसायीक परीक्षा म्हणजे उमेदवारांचे तांत्रिक कौशल्याचे मूल्यमापन करण्यासाठी नागपूर महानगरपालिका एखाद्या अभिकरणाकडून अथवा शासकीय / निमशासकीय कार्यालयामार्फत आयोजित केलेली परीक्षा असा आहे.

व) “निवड समिती अध्यक्ष” म्हणजे कर्मचारी / अधिकारी निवड समितीसाठी सक्षम प्राधिकारी यांनी निवड समिती अध्यक्ष म्हणून नियुक्त केलेले अधिकारी.

३. वर्गीकरण :-

नागपूर महानगरपालिका नागपूर, अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील सेवांचे गट पुढील प्रमाणे असतील.

(१) अधिकारी - गट “अ” व गट “ब”

(२) कर्मचारी - गट “क”

४. नेमणूकीची पध्दत व अर्हता :-

महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ५४ चे तरतूदीनुसार नेमावयाच्या अधिकारी व कर्मचाऱ्यांसाठी नेमणूकीची पध्दत व आवश्यक शैक्षणिक व इतर अर्हता विनियमांना जोडण्यात आलेल्या परिशिष्टात विहित केल्याप्रमाणे असतील.

५. पात्रतेच्या अटी :-

५.१ भारतीय नागरीक.

५.२ महाराष्ट्र राज्याचा अधिवासी - उमेदवाराने महाराष्ट्र राज्यात सलग १५ वर्ष रहात असल्याचे सक्षम प्राधिकाऱ्यांचे अधिवास प्रमाणपत्र अर्जासोबत सादर करणे आवश्यक आहे.

५.३ वयोमर्यादा - अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकास उमेदवाराचे वय किमान १८ वर्षे असावे व कमाल वयाची अट अन्यथा विहीत केलेली नसेल तेव्हा ३३ वर्षे इतकी असेल.

५.४ उच्च वयोमर्यादा खालील बाबतीत शिथिलक्षम :-

५.४.१ महाराष्ट्र शासनाने मान्यता दिलेल्या मागासवर्गीय उमेदवारांकरिता ५ वर्षापर्यंत शिथिलक्षम राहील.

५.४.२ पात्र खेळाडूंच्या बाबतीत ५ वर्षापर्यंत

५.४.३ भूदल, नाविक दल वा हवाईदलाच्या सेवेमध्ये सहा महिने व त्यापेक्षा अधिक सेवा केली असेल तर संरक्षण सेवेमध्ये केलेली एकूण सेवा अधिक तीन वर्षे हा कालावधी माजी सैनिकांचे वय मोजताना कमी करण्यात येईल.

५.४.४ नागपूर महानगपालिकेच्या अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील कर्मचाऱ्यांसाठी विभागाच्या आस्थापनेवर त्यांच्या झालेल्या सेवेच्या वर्षा इतकी किंवा ७ वर्षे यांपैकी जास्त असेल तेवढी वर्षे शिथिलक्षम राहील.

५.४.५ शासनाच्या विहीत विनियम व धोरणाशी सुसंगत शिथीलीकरण आवश्यक आहे. परंतु असे की, वरील नियम ५.४.१ ते ५.४.४ यात नमूद केलेले शिथिलीकरण हि शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशाप्रमाणे असेल.

५.४.६ मराठी भाषा लिहीता, वाचता व बोलता येणे आवश्यक.

५.४.७ पदासाठी विहीत केलेली किमान अर्हता धारण करणे आवश्यक

५.४.८ वाहनचालक, यंत्रचालक, वाहनचालक (अग्नीशमन) आणि वर्ग-४ पदे वगळून इतर सर्व पदावरील नेमणूकीसाठी / पदोन्नतीसाठी शासन वेळोवेळी निश्चित करेल असे, संगणक हाताळणी / वापराबाबतचे ज्ञान, एक अतिरिक्त आवश्यक अर्हता असेल.

५.४.९ "एकाकी पद" सामान्यत: पदोन्नतीने भरण्यात येईल. तथापि, विशिष्ट अर्हता आवश्यक असलेल्या **एकाकी पदावर पदोन्नतीने नियुक्तीसाठी उमेदवार उपलब्ध नसल्यास तसे पद महापालिकेस प्रतिनियुक्तीने किंवा नामनिर्देशनाने भरता येईल.**

५.४.१० पदोन्नतीने करावयाची कोणतीही नियुक्ती, "ज्येष्ठता व पात्रता" या तत्वावर नियमीत अर्हता प्राप्त कर्मचाऱ्यामधून केली जाईल.

६. विविध प्रवर्गासाठी आरक्षण :-

६.१ मागासवर्गीयांच्या आरक्षणाबाबत :-

राज्य शासनाने वेळो वेळी दिलेल्या आदेशानुसार अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त व भटक्या जाती, विशेष मागास प्रवर्ग व इतर मागासवर्ग या प्रवर्गासाठी योग्य त्या संवर्गातून नेमणूकीसाठी पदे आरक्षित ठेवण्यात येतील.

६.२ अपंग आरक्षणाबाबत :-

अग्निशमन विभागातील पदांसाठी अपंग आरक्षण लागू नाही.

६.३ खेळाडू आरक्षणाबाबत :-

खेळाडूंचे आरक्षण शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार राहील.

६.४ माजी सैनिकांना देण्यात येणाऱ्या आरक्षणाबाबत :-

माजी सैनिकांचे आरक्षण शासनाच्या सक्षम विभागाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार राहील. तथापि, या उमेदवारांना शैक्षणिक अर्हता तसेच शारीरीक अर्हता व क्षमता पात्रता परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

६.५ अनूकंपा तत्वावरील नेमणूकीकरीता आरक्षण :-

अनूकंपा तत्वावर नागपूर महानगरपालिका नागपूर, अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील सेवेत कारावयाच्या नेमणूका या शासनाच्या वेळोवेळी प्रचलित असलेल्या धोरणानुसार करण्यात येतील. तथापि, या उमेदवारांना किमान शैक्षणिक अर्हता तसेच शारीरीक अर्हता व क्षमता पात्रता परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

७. नागपूर महानगपालिकेतील अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागामधील कोणत्याही पदावर नियुक्ती होण्याकरिता असलेली अनर्हता :-

जर ती व्यक्ती :-

७.१ भारताचा नागरीक नसेल,

७.२ जर त्याला महानगरपालिकेच्या सेवेतून किंवा कोणत्याही स्थानिक प्राधिकरणाच्या सेवेतून किंवा कोणत्याही सरकारच्या सेवेतून काढून टाकण्यात आले असेल, किंवा बडतर्फ केले असेल किंवा सेवेतून कमी केले असेल **किंवा**

७.३ जर त्यावर नैतिक अध:पतनाच्या / फौजदारी गुन्ह्याच्या संबंधात सिध्ददोश ठरविण्यात आला असेल **किंवा**

७.४ जर त्याच्या / तिच्या एकाहून अधिक हयात पत्नी / पती असतील आणि स्त्री उमेदवाराच्या बाबतीत तिचा पती हयात असतांना, जर त्याने / तिने अन्य व्यक्तीशी विवाह केला असेल **किंवा**

७.५ जर त्याला / तीला दोन पेक्षा अधिक हयात अपत्ये असतील, (यात दुसऱ्यावेळी जुळी अपत्ये झाल्यास ती बाब वगळून) **किंवा**

७.६ मा.न्यायालयात ज्या गुन्ह्यासाठी कैदेची शिक्षा फर्मावता येते, अशा गुन्ह्यासाठी सहा महिन्याहून अधिक मुदतीची कैदेची शिक्षा झाली असेल व ती शिक्षा अपील व पुर्नरिक्षणात रद्द झाली नसेल, अशी व्यक्ती **किंवा**,

७.७ महापालिकेच्या सेवेत असताना सिध्दापराध होऊन सहा महिन्यापेक्षा अधिक मुदतीची कैदेची शिक्षा झाली असेल व ती शिक्षा अपील वा पुर्नरिक्षणात रद्द झाली नसेल, तर अशी व्यक्ती महानगरपालिकेच्या अग्निशमन व आणिबाणी सेवा विभाग व महानगरपालिकेतील कोणत्याही पदावर नियुक्ती देण्यास वा चालू ठेवण्यास अपात्र समजली जाईल.

**८. तोतयेगिरीकरिता शिक्षा :-**

जे उमेदवार तोतयेगिरी करणे किंवा बनावट कागदपत्रे सादर करणे किंवा कादपत्रांमध्ये अनधिकृतरित्या फेरफार करणे किंवा चुकीची किंवा खोटे कथन करणे किंवा महत्वाची माहिती दडवून ठेवणे किंवा अनुचित कामाकरिता माहितीचा वापर किंवा प्रयत्न करणे अशा गुन्ह्यामध्ये अपराधी असल्याचे कोणत्याही टप्प्यावर आढळून आले तर त्याच्या / तिच्या विरुध्दच्या फौजदारी कार्यवाहीस तो बाध्य असेल व त्याशिवाय महापालिकेत व अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील कोणत्याही पदावर नियुक्ती केली जाण्यास तो / ती अपात्र ठरवला जाईल आणि जर त्याची / तिची त्या अगोदरच नियुक्ती करण्यात आलेली असेल तर त्याला / तिला सेवेतून काढून टाकण्यात येईल.

**९. परिक्षेकरीता / मुलाखतीकरीता केलेल्या प्रवासाचा खर्च :-**

नामनिर्देशनाद्वारे नियुक्ती करण्याच्या बाबतीत, परिक्षेच्या / मुलाखतीच्या प्रयोजनाकरीता उमेदवारांना करावे लागणारे सर्व प्रवास हे, याबाबतीत काही विनिर्दिष्ट प्रवर्गाच्या उमेदवारांच्या संबंधात वेळोवेळी शासन / महानगरपालिकेकडून मंजुर करण्यात आलेल्या कोणत्याही सवलतीच्या अधीन राहुन, स्वत:च्या खर्चाने असतील. याबाबतचा अंतिम निर्णय घेण्याचा अधिकार सक्षम प्राधिकारी यांना असेल.

**१०. नियुक्तीकरीता निवड झाल्यावर पदस्थापना :-**

नियुक्तीकरीता निवड झालेले उमेदवार हे नागपूर महानगरपालिकेच्या हद्दीत कोणत्याही ठिकाणी किंवा नागपूर महानगरपालिकेच्या हद्दीच्या बाहेर अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागाचे कार्यालय जेथे असतील तेथे किंवा अग्निशमन व आणिबाणी सेवा विभाग भविष्यकाळात कार्यालय सुरु करु शकेल तेथे पदस्थापना केले जाण्यास पात्र ठरतील. तात्पुरत्या आपत्कालीन परिस्थितीत शासनाकडून तशी मागणी आल्यास अशा कर्तव्याच्या ठिकाणी जावे लागेल.

**११. सरळसेवा भरतीद्वारे उमेदवार उपलब्ध न झाल्यास अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील उमेदवारास पदोन्नती किंवा नियुक्ती देणे :-**

जेव्हा एखाद्या पदावर नामनिर्देशनाद्वारे नियुक्ती करण्यासाठी विहित कार्यपध्दती अवलंबून योग्य उमेदवार उपलब्ध झाला नाही व पद भरण्याची तातडी व आवश्यकता तपासून अशा वेळी महानगरपालिकेतील पात्र अधिकारी / कर्मचारी यांची निवड सक्षम प्राधिकाऱ्याच्या मंजुरीने तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देता येईल. सहा महिन्याच्या आत पुन्हा जाहिरात देऊन थेट भरतीद्वारे योग्य उमेदवार मिळविण्याकरीता नव्याने प्रयत्न करण्यात येईल. जर, विभागीय उमेदवाराच्या तात्पुरत्या नियुक्तीच्या दिनांकापासुन एक वर्षाच्या कालावधीनंतर, कोणताही योग्य उमेदवार थेट भरती करीता उपलब्ध झाला नाही तर सक्षम प्राधिकारी, सक्षम निवड प्राधिकाऱ्याची मंजुरी मिळवल्यानंतर काही कालावधीसाठी विभागीय उमेदवाराची निवड तात्पुरत्या स्वरुपातील पदोन्नतीने केलेली नियुक्ती पुढे चालु ठेवू शकेल.

**१२. उमेदवाराने दबाव आणल्यास त्यांना अपात्र ठरविण्यात येईल.**

अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागात एखाद्या पदावर नियुक्ती होण्याकरिता किंवा विभागातील वरीष्ठ पदावरील पदोन्नतीकरीता उमेदवाराने कोणत्याही प्रकारे प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणे दबाव आणायचा प्रयत्न केला किंवा त्याच्या उमेदवाराकरीता मदत केली तर ती बाब त्याच्या निवडकरीता किंवा पदोन्नतीकरीता अपात्र ठरेल.

**१३. प्रतिनियुक्तीद्वारे नागपूर महानगरपालिका, अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागात नियुक्ती.**

या विनियमात काहीही नमूद असेल तरी आवश्यक प्रशासकीय / तांत्रीक विषयातील निष्णांत, संबंधीत पदासाठी विहीत अर्हता प्राप्त, अनुभव असलेला उमेदवार अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागात उपलब्ध नसल्यास अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील गट “अ” मधील पदावर गरजेनूसार सक्षम प्राधिकारी यांना प्रशासकीय व व्यावसायीक दृष्टीकोनातुन विचार करुन राज्य / केंद्र शासनातील अथवा त्यांच्या सार्वजनिक उपक्रमातील किमान बारा किंवा पंधरा वर्ष सेवा झालेल्या सुयोग्य अधिकाऱ्यांची नेमणूक राज्य शासनाच्या मान्यतेने जास्तीत जास्त चार वर्षासाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल.

परंतु संबंधीत पदाच्या सेवाप्रवेश नियमामध्ये तरतुद केल्याप्रमाणे, जेव्हा आवश्यक अर्हता व अनुभव असलेल्या आणि निवडीकरीता पात्र असलेला उमेदवार किंवा पदावरील पदोन्नतीकरीता योग्य विभागीय उमेदवार उपलब्ध होईल, तेव्हा प्रतिनियुक्तीवर असणाऱ्या व्यक्तीला त्याच्या मुळ विभागाला परत पाठविण्यात येईल.

**१४. प्रतिनियुक्तीद्वारे नागपूर महानगरपालिका, अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागामार्फत सेवा इतरत्र उपलब्ध करुन देणेबाबत :-**

महानगरपालिकेच्या अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागात आवश्यक प्रशासकीय / तांत्रीक विषयातील निष्णात संबंधीत पदासाठी विहित अर्हताप्राप्त, अनुभव असलेला उमेदवार महानगरपालिकेच्या अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागात उपलब्ध असल्यास / नसल्यास व अशा स्थितीत गट “अ” मधील पदावरील अधिकाऱ्यांची सेवा इतरत्र अग्निशमन व आणिबाणी सेवासाठी उपलब्ध करुन देण्याची आवश्यकता भसल्यास, प्रशासकीय व व्यावसायीक दृष्टीकोनातुन विचार करुन राज्य / केंद्र शासनातील अथवा त्याच्या सार्वजनिक उपक्रमातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाच्या अग्निशमन व आणिबाणी सेवासाठी किमान बारा वर्षे सेवा झालेल्या सुयोग्य अधिकाऱ्याची नेमणूक सक्षम प्राधिकारी, राज्य शासनाच्या मान्यतेने जास्तीत जास्त चार वर्षासाठी प्रतिनियुक्तीद्वारे नियुक्ती करता येईल.

**१५. संगणक हाताळणी / वापराबाबतच्या ज्ञानाची आवश्यकता :-**

विनियम ५ मधील तरतुदीप्रमाणे वयोमर्यादा, शैक्षणिक अर्हता व अनुभवाबाबत या विनियमांना जोडण्यात आलेल्या परिशिष्टात विहित केलेल्या अटी शिवाय महानगरपालिका अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागाच्या वर्ग “अ” ते वर्ग “क” मधील सेवेतील चालक, यंत्र चालक, वाहन चालक (अग्निशमन), हि पदे वगळून पदावरील नेमणूकीसाठी / पदोन्नतीसाठी संगणक हाताळणी (MS-CIT) वा वापरासाठी शासनाने वेळोवेळी विहित केलेली अर्हता अनिवार्य असेल.

MS-CIT परीक्षा उत्तीर्ण होण्यापासुन शासनाने वेळोवेळी निर्गमीत केलेल्या शासन निर्णयानुसार सुट अनुज्ञेय राहील.

**१६. वयोमर्यादा :-**

१. महानगरपालिका अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागात प्रथम नियुक्ती मिळण्यासाठी आवश्यक असणारी कमाल वयाची अट अन्यथा विहित केलेली **नसेल** तेव्हा ३३ वर्ष इतकी असेल तथा ती गट “क” मधील नेमणूकांसाठी किमान वयाची अट १८ वर्ष असेल तसेच गट “अ” व गट “ब” मधील नेमणूकासाठी किमान वयाची अट २१ वर्ष असेल. हि वयोमर्यादा ह्या संबंधीच्या आदेशात शासनाने वेळोवेळी सुधारणा केल्याप्रमाणे राहिल. मात्र, अनुसुचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती व इतर मागासवर्गीय उमेदवारासाठी कमाल वयोमर्यादेची अट ५ वर्षाने अथवा शासनाच्या प्रचलित आदेशात नमुद केल्याइतकी शिथील करण्यात येईल.

२. जागा भरण्यासाठी स्थानिक वृत्तपत्रात प्रसिध्द केलेली जाहिरात तसेच स्थानिक सेवा योजन कार्यालयास एम्प्लॉयमेंट एक्सचेंज (कम्पलसरी नोटीफिकेशन ऑफ व्हॅकन्सीज) अधिनियम १९५९ (अधिनियम १९५९ चा ३१)” अन्वये जागा भरण्यासाठी पाठविलेले मागणीपत्र यामध्ये नमुद अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकास वयाची अट पुर्ण करणाऱ्या उमेदवाराने वयाची अट पुर्ण केली असे मानले जाईल.

**१७. अपवादात्मक परिस्थीतीत अर्हतेच्या अटी शिथिल करण्याचे अधिकार :-**

१. नागपूर महानगपालिका, अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील विविध संवर्गातील पदासाठी आवश्यक शैक्षणिक व इतर अर्हते संबंधीच्या तरतुदी व नियुक्तीच्या पध्दती **जोडपत्र-२ (अनुसूची-अ)** मध्ये विहित केल्यानुसार असतील तथापि निवड समितीने केलेल्या शिफारशी तसेच उमेदवाराची उच्च शैक्षणिक पात्रता, लक्षणीय कार्यानुभव इत्यादी परिस्थिती विचारात घेऊन त्या पदावरील नियुक्ती बाबत सक्षम प्राधिकारी शैक्षणिक अर्हता अनुभव व वय या संदर्भातील विहीत पात्रतेच्या अटी शिथिल करु शकेल.

२. अशा प्रकारे विहीत अर्हतेच्या अटी शिथील करण्याबाबत निवड समितीने शिफारस केलेली प्रकरणे सक्षम अधिकारी यांच्या मान्यतेसाठी सादर करणे आवश्यक आहे.

**१८. नामनिर्देशन सरळसेवा व पदोन्नतीद्वारे भरावयाचे प्रमाण :-**

अ) या विनियमात नामनिर्देशन तथा पदोन्नती अशा दोन्ही प्रकारे पदे भरण्याची तरतुद असल्यास नामनिर्देशन या पदोन्नतीद्वारे भरावयाचे प्रमाण **जोडपत्र-२ (अनुसूची-अ)** नमूद केल्याप्रमाणे असेल, परंतु नामनिर्देशाने उमेदवार उपलब्ध न झाल्यास असे पद नामनिर्देशाने उमेदवार उपलब्ध होईपर्यंत प्रतिनियुक्तीने किंवा पात्र असणाऱ्या अधिकाऱ्याच्या पदोन्नतीने तात्पुरत्या स्वरुपात भरता येईल. तथापि, जेव्हा अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागाचा अधिकारी / कर्मचारी उपलब्ध होईल तेव्हा प्रतिनियुक्तीवरील अधिकारी प्रत्यावर्तीत करावा.

ब) कोणत्याही पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यापुर्वी सक्षम प्राधिकारी संबंधीत संस्थेकडे योग्य त्या अधिकाऱ्यांची नेमणूक करण्यासंबंधी मागणी करतील. राज्य शासनाच्या मान्यतेने त्यावर संबंधीत संस्थेकडून उमेदवाराची नियुक्ती झाल्यानंतर त्या अधिकाऱ्याला महानगरपालिकेच्या आवश्यकतेनुसार कोणत्या ठिकाणी व कोणत्या समकक्ष पदावर नेमावे व त्यांना कामासाठी कोणते विषय द्यावेत यासंबंधी सक्षम प्राधिकारी योग्य तो निर्णय घेतील.

**१९. मराठी भाषेचे ज्ञान :-**

नागपूर महानगरपालिका अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील सर्व अधिकारी / कर्मचारी यांना मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक आहे. गट "अ" व गट "क" वर्गातील अधिकारी व कर्मचारी यांना मराठी या विषयासह शालांत परीक्षा अथवा शासनाने विहित केलेली एतद्र्थ मंडळाची भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

**२०. पदोन्नतीने नेमणूक करणे :-**

ज्येष्ठता तथा पात्रता या तत्वावर विनियम-१९ जोडपत्र-२, अनुसूची-अ नुसार विहित विभागीय परीक्षा उत्तीर्ण झालेल्या व इतर अर्हता धारण करणाऱ्या अधिकारी / कर्मचाऱ्यांची पदोन्नती नियुक्ती केली जाईल.

**२०-अ. विनंतीनुसार / बदलीने सेवेत समावून घेणे :-**

विनंतीनुसार / बदलीने सेवेत सामावून घेण्याबाबत प्राप्त निवेदनावर संबंधीत दोन्ही नियुक्ती प्राधिका-याच्या संम्मतीने परस्पर निर्णय घेता येईल.

**२१. नामनिर्देशनाद्वारे नेमणूक :-**

अ) शासनाच्या प्रचलीत नियमाप्रमाणे संबंधीत क्षेत्रात सर्वाधिक खप असलेल्या वर्तमानपत्रामध्ये जाहिरात देण्यात यावी व त्यापैकी किमान १ मराठी व १ इंग्रजी वर्तमानपत्रात जाहिरात देणे आवश्यक आहे.

ब) ज्या पदांना एम्प्लॉयमेंट एक्सचेंज (कम्पलसरी नोटीफीकेशन ऑफ व्हॅकन्सीज) ॲक्ट १९५९ लागु असेल. त्या पदासाठी सेवाभरती करतांना शासनाच्या स्थानिक सेवायोजन अधिनियम १९५९ कार्यालयाकडून उमेदवाराची नावे मागविली जातील. तसेच अनुसूचीत जाती, अनुसूचीत जमाती, भटक्या जाती व विमुक्त जमातीसाठीच्या राखीव पदावर नामनिर्देशनाद्वारे नेमणूका करण्यासाठी राज्य शासनाने वेळोवेळी निश्चीत केलेल्या इतर मान्यताप्राप्त संस्था वा प्राधिकाऱ्याकडून याद्या मागविण्यात येऊन त्यातील उमेदवारांचाही विहित भरती प्रक्रिया अवलंबून नियुक्ती प्राधिकारी विचार करील.

**२२. नेमणूकीसाठीची कार्यपध्दती :-**

पदोन्नती व नामनिर्देशनाद्वारे करावयाच्या नेमणूका या विनियमात निर्देशित केल्याप्रमाणे नियमित होतील.

**२३. संवर्ग बदल :-**

नागपूर महानगरपालिकेच्या अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागात, अग्निशमन विमोचक संवर्गात नेमणूक झालेल्या कर्मचाऱ्याला समान वेतनश्रेणीतील चालक (अग्निशमन) संवर्गात **अथवा** समान वेतनश्रेणीतील अग्निशमन विमोचक या दुसऱ्या संवर्गात, त्याच्या स्वेच्छेने, सक्षम प्राधिकारी यांच्या मंजूरीने, रिक्त पद असल्यास व विहीत पात्रता धारण करित असल्यास संवर्ग बदल करता येईल. संवर्ग बदल कोणत्याही कर्मचा-याला त्याच्या सेवाकाळात एकदाच करता येईल. तसा बदल केल्यानंतर त्याची सेवा ज्येष्ठता नवीन संवर्गात बदल करण्याच्या दिनांकापासून धरण्यात येईल.

**२४. परिविक्षाधीन कालावधी :-**

अ) गट "अ" आणि गट "ब" मध्ये नामनिर्देशनाद्वारे नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांसाठी परिविधाक्षिन कालावधी त्याच्या नेमणूकीच्या मूळ दिनांकापासून दोन वर्षाचा असेल. तथापि, महापालिकेच्या कामकाजाची तातडीची निवड लक्षात घेऊन, हा कालावधी उमेदवाराचे मागील १८ (अठरा) महिन्याचे काम लक्षात घेऊन, नियुक्ती प्राधिकाऱ्याच्या सहमतीने अपवादात्मक परिस्थितीत किमान सहा महिने इतका कमी करता येईल. अशा उमेदवाराचे परिविक्षाधीन कालावधीतील काम समाधानकारक नसल्यास अपवादात्मक बाब म्हणून आणि त्यासंबंधी कारणे नमूद करुन परिविक्षा कालावधी पुढील १ वर्षापर्यंतच वाढविता येईल. तद्नंतरही या वाढीव कालावधीत काम समाधानकारक नसल्यास, सदर व्यक्तीची सेवा समाप्त करण्यात येईल.

सदर कालावधीपैकी सुरुवातीचा एक वर्षाचा कालावधी हा प्रशिक्षकणाचा असेल तथापि या सर्व कालावधीत उमेदवार संपूर्ण मासिक वेतनास, वेतनवाढीसह पात्र राहतील.

ब) प्रशिक्षण कालावधीत उमेदवार विभागाच्या परिक्षेत अनुत्तीर्ण झाल्यास त्याला एक महिन्याच्या अंतराने पुन:श्च परिक्षेसाठी बसता येईल. तथापि या प्रयत्नातही जर उमेदवार अनुत्तीर्ण झाल्यास त्याला सेवेतून कमी करण्यात येईल.

क) पदोन्नतीद्वारे नियुक्ती देण्यात आलेला कर्मचारी त्या पदासाठी योग्य नसल्याचे आढळून आल्यास त्याला / तिला योग्यती संधी देऊन त्याच्या मुळ पदावर पदावनत करण्यात येईल व ती कार्यवाही शिक्षा या सदरात मोडणार नाही.

**२५. शारिरीक पात्रता आणि चारित्र्य पडताळणी अहवाल :-**

महापालिका सेवेतील कोणत्याही पदावरील नामनिर्देशनाने नियुक्ती :-

(अ) महापालिकेच्या सक्षम वैद्यकीय अधिकाऱ्याचे / जिल्हा सिव्हील सर्जन यांचे विहित नमुन्यातील आरोग्यविषयक वैद्यकीय प्रमाणपत्र सादर केल्यानंतर, आणि

(आ) उमेदवाराच्या पूर्वचारीत्र्य पडताळणीबाबत (Verification of Antecedents) सक्षम प्राधिकाऱ्याकडून अहवाल प्राप्त झाल्यानंतर,

(इ) याबाबत सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडील शासन परिपत्रक क्र.चापअ-१००८/प्र.क्र.५७/२००८/१६अ, दि.३०/०९/२००८ तसेच याबाबत सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडून वेळोवेळी निर्गमित केलेले व करण्यात येणारे आदेश लागू राहतील.

**टिप :-** नागपूर महानगपालिका, अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील उमेदवारांच्या शारिरीक पात्रतेच्या संबंधातील, परीक्षेकरिता असलेले नियम हे शासनाकडून अनुसरण्यात येणाऱ्या नियमाप्रमाणेच असतील.

**२६. वैद्यकीय कारणास्तव नियुक्तीवरील अपात्रता.**

ज्या उमेदवाराचे शासन विहीत करील अशा वैद्यकीय परीक्षेत चांगले मानसिक व शारिरीक आरोग्य असल्याचे आणि त्याच्या पदाची कर्तव्ये पार पाडतांना अडथळे आणू शकेल अशा मानसिक व शारीरिक दोषांपासून मुक्त असल्याचे आढळून आले नाही तर अशा कोणत्याही उमेदवाराला नागपूर महानगरपालिका, अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील पदावर नियुक्ती करता येणार नाही.

**२७. हे विनियम लागू नसणाऱ्या नेमणूका :-**

या विनियमांतील तरतूदी खालील नेमणूकांना लागू होणार नाहीत.

१. अंशकालिक स्वरुपाच्या नेमणूका :-

२. मानसेवी स्वरुपाच्या नेमणूका :-

३. हजेरीपटावरील / रोजंदारीवरील नेमणूका :-

**२८. अधिकाराचे प्रत्यायोजन :-**

सक्षम प्राधिकरण या नियमाखाली स्वत:ची कोणतीही कार्य, अधिकारी आणि जबाबदाऱ्या याचे पुनर्प्रत्यायोजन करण्यासाठी, नागपूर महानगरपालिका, अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागाच्या कोणत्याही पदनिर्देशित अधिकाऱ्याला अभियोग दाखल करणे ही बाब वगळून, प्राधिकृत करु शकेल.

**२९. निरसन :-** (Saving and Repeal)

अ) या विनियमातील तरतुदी अस्तित्वात येण्यापुर्वी नागपूर महानगरपालिका, अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागाने सेवाभरती संबंधी वापरलेली पध्दत व त्यासाठी वेळोवेळी काढलेले आदेश हे नियम अस्तित्वात आल्यावर निरसित होतील.

आ) हे विनियम अस्तित्वात येण्यापुर्वी नागपूर महानगरपालिका, अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागाने केलेली सेवाभरती व त्यासाठी वेळोवेळी काढलेले आदेश याच नियमाखाली काढण्यात आलेले आहे असे समजण्यात येईल.

इ) या विनियमामध्ये नमूद बाबी / तरतुदी व्यतिरिक्त विशेष मुद्याबाबत शासनाच्या महाराष्ट्र नागरी सेवा नियमा मधील तरतुदी बंधनकारक असतील.

ई) या नियमामध्ये काहीही नमूद असले तरी, शासनाच्या धोरणानुसार वेळोवेळी होणारे बदल सक्षम प्राधिकरणाच्या मंजुरीने नागपूर महानगपालिका, अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागास लागू होतील.

उ) हे नियम अस्तित्वात येण्यापूर्वी विहीत मार्गीने झालेल्या सरळसेवा नियुक्त्यांना शासनाने अन्यथा वेगळी लेखी कारणे नमूद करुन निर्देश दिले नसतील तर या नियमातील तरतुदीमुळे बाधा येणार नाही.

ऊ) वेळोवेळी सेवाभरती / आरक्षण / वयोमर्यादा इत्यादी बाबत निर्देश देणारे राज्य शासनाचे नियम, अधिनियम, निर्णय व न्याय निर्णय या नियमात सुधारणा (Amendment) करण्यात येईपर्यंत प्रचलित शासन निर्णय / न्याय निर्णयानुसार कार्यवाही करण्यात येईल.

आयुक्त<br>
नागपूर महानगरपालिका,<br>
नागपूर

**नागपूर महानगरपालिका नागपूर**
**अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील अधिकारी / कर्मचारी**
**( वर्गीकरण, सेवाभरती व पदोन्नती)**
**विनियम - २०१७**
**जोडपत्र - १**
**नागपूर महागरपालिका नागपूर**

अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील ( वर्गीकरण, नेमणुकीसाठी अर्हता व सेवाभरती),२०१७ च्या विनियमामाध्ये नामनिर्देशन व पदोन्नती या दोन पध्दतीनी नेमणुका करण्यासाठी खालील पध्दतीचा विहित करण्यात येत आहे.

**१. अधिकारी / कर्मचारी निवड समिती :-**

वरील दोन्ही पध्दतीने करावयाच्या नियुक्त्यांकरिता महाराष्ट्र महापालिका अधिनियम कलम ५४ अन्वये विहित केल्यानुसार कर्मचारी निवड समिती गठीत करण्यात येईल. सदर समिती गठीत करण्यात आलेल्या दिनांकापासून एक वर्ष कालावधीकरिता अथवा भरती प्रक्रिया पूर्ण होईपर्यंतच्या कालावधीकरिता (यातील जो कालावधी कमी असेल त्या कालावधीकरिता) वैध राहील.

या व्यतिरिक्त नामनिर्देशनाने नियुक्ती करताना, मागासवर्गीय तसेच महिला उमेदवारांच्या हितरक्षणासाठी अशा समितीचे सदस्य म्हणून शासनाच्या प्रचलित आदेशानुसार संबंधित विभागाच्या अधिका-यांना मुलाखतीच्यावेळेस विशेष निमंत्रीत म्हणून बोलावले जाईल व त्या अधिकाऱ्याने केलेल्या मतप्रदर्शनाची नोंद समितीच्या कार्यवृतांत घेण्यात येईल.

**२. नामनिर्देशनाद्वारे नेमणूक :-**

(अ) वृत्तपत्रातील जाहिरातीला अनुसरुन आलेल्या किंवा नागपूर महानगरपालिकेच्या कर्मचाऱ्यांकडून मुदतीत आलेल्या / सेवा विनियम केंद्राकडून / शासनाच्या आदेशानुसार अन्य संस्था / कार्यालयाकडून आलेल्या उमेदवारांचा अशा नेमणूकीसाठी विचार करण्यात येईल.

(ब) जाहिरातीत / सेवा विनियमन केंद्राकडे पाठविलेल्या मागणीपत्राच्या संदर्भात लेखी चाचणीचा उल्लेख असल्यास अशा उमेदवारांना तशी चाचणी द्यावी लागेल. लेखी चाचणीचे विषय व गुण याबाबतचा निर्णय सक्षम प्राधिकारी घेतील. ही चाचणी नागपूर महानगरपालिका स्वत: घेईल अथवा सक्षम प्राधिकारी यांनी निर्देशित केलेल्या बाबतीत प्राविण्य असलेल्या शासनेतर संस्था / अभिकरणामार्फत ठरवून दिलेल्या पध्दतीप्रमाणे घेता येईल. परंतु अपवादात्मक परिस्थितीत नेमणूकीच्या जागा व वरील (अ) प्रमाणे असलेल्या उमेदवारांची संख्या लक्षात घेऊन अशी चाचणी न घेण्याचा निर्णय लेखी कारणे नमूद करुन सक्षम प्राधिकारी यांना घेता येईल.

(क) चाचणी परिक्षेत किमान ५० टक्के गुण मिळविण्याच्या मर्यादेच्या अधीन राहून रिक्त पदाच्या तिप्पट एवढ्या उमेदवारांना किंवा मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी वरील (ब) च्या निर्णयाप्रमाणे चाचणी परिक्षा न घेतल्यास अशा सर्व निर्देशित पात्रता धारण करणाऱ्या उमेदवारांना मुलाखतीसाठी बोलाविले जाईल व अशा उमेदवारांची यादी निवड समितीच्या प्रत्येक सदस्यास मुलाखतीचे वेळी पुरविण्यात येईल. परंतु अनुसूचित जाती / अनुसूचित जमाती / विमुक्त जाती व भटक्या जमाती / विशेष मागास प्रवर्ग / इतर मागासवर्गीय उमेदवारांसाठी ५० टक्के ऐवजी ४५ टक्के गुण मिळविण्याची अट असेल.

(ड) मुलाखतीत खालील बाबींवर विशेष लक्ष दिले जाईल.

१) समाजिक प्रश्नाबाबतची जाणीव.
२) पुर्वानुभव :- ज्या पदावर नेमणूक द्यावयाची त्या पदासाठी आवश्यक असा अनुभव.

३) सेवाभरती विनियमात विशेष अर्हता वा इतर कोणत्याही बाबतीत प्राधान्य नमूद असल्यास त्यासाठी द्यावयाचे गुण.

**३. सरळसेवा भरती करतांना खालील निकष व गुणांकन पध्दती :-**

लेखी परीक्षा (तांत्रिक/सामान्यज्ञान) - १०० गुणांची असेल.

लेखी परिक्षेसाठी पात्र ठरण्याकरीता अर्जदाराने सेवा भरती विनिमयास अधीन राहून शैक्षणिक पात्रता / तांत्रिक शिक्षणाची अर्हता व अग्निशमन व आणिबाणी सेवा दलात कार्य करण्यासाठी आवश्यक असणारी शारीरीक क्षमता पात्र असणे आवश्यक राहील.

जाहीरातीस असणारा एकूण प्रतिसादाचा विचार करुन उमेदवारांना शारिरीक चाचणी परिक्षेस पात्र करण्यात येईल तथापी चालक यंत्रचालक व चालक (अग्निशमन) या पदासाठी या लेखी परीक्षेत सर्व साधारणत: आवश्यक पदांच्या १:५ किंवा १:७ या प्रमाणात अथवा जाहिरातीस असणारा एकूण प्रतिसादाचा विचार करुन उमेदवारांना शारीरीक चाचणी परिक्षेस पात्र करण्यात येईल. तथापि, चालक यंत्र चालक व चालक (अग्निशमन) या पदांसाठी लेखी परिक्षा नसेल.

**किमान शारीरीक पात्रता :-** अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील सर्व संवर्गातील पदांसाठी उमेदवारांची शारीरीक पात्रता खालीलप्रमाणे असणे आवश्यक आहे.

१. उंची - १६५ से.मी. (महिला उमेदरावारांसाठी उंची १६२ से.मी.)
२. वजन - ५० किलोग्रॅम
३. छाती - न फुगवता - ८१ से.मी.
फुगवून - ८६ से.मी. (किमान ५ से.मी. फुगवणे आवश्यक राहील.) (महिला उमेदवारासाठी लागू नाही)
४. दृष्टी - सामान्य (उपरोक्त शारीरीक पात्रता नसणारे उमेदवार पुढील चाचणीसाठी पात्र ठरणार नाहीत)

**शारीरीक क्षमता / पात्रता चाचणी :-**

१. १५ फूट दोर चढणे - १५ गुण
२. १०० मीटर्स अंतर ५० किलोग्रॅम मानवी प्रतिकृती खांद्यावर घेवून धावणे - १५ गुण
३. शिडी चढणे / उतरणे - १५ गुण
४. उंची - (अधिक असल्यास) - ०५ गुण
५. पोहणे - २० गुण

**१) दोर चढणे ( एकूण गुण-१५)**

| **अंतर** | **गुण** |
|---|---|
| पूर्ण | १५ |
| ३ / ४ | १२ |
| १ / २ | ०८ |
| १ / ४ | ०४ |

२) १०० मीटर्स अंतर ५० कि.ग्रा. मानवीय प्रतिकृती खांद्यावर घेवून धावणे - (एकूण गुण-१५)

| वेळ (सेकंद) | गुण |
|---|---|
| २० किंवा कमी | १५ |
| २१ | १४ |
| २२ | १३ |
| २३ | १२ |
| २४ | ११ |
| २५ | १० |
| २६ | ९ |
| २७ | ८ |
| २८ | ७ |
| २९ | ६ |
| ३० | ५ |
| ३१ पेक्षा अधिक | ०० |

३) शिडी चढणे / उतरणे ( एकूण गुण-१५)

| वेळ (सेकंद) | गुण |
|---|---|
| २० किंवा कमी | १५ |
| २१ | १४ |
| २२ | १३ |
| २३ | १२ |
| २४ | ११ |
| २५ | १० |
| २६ | ९ |
| २७ | ८ |
| २८ | ७ |
| २९ | ६ |
| ३० | ५ |
| ३१ पेक्षा अधिक | ०० |

४) उमेदवारांच्या उंचीसापेक्ष देण्यात येणाऱे गुण (एकुण गुण-०५)

| से.मी. | गुण |
|---|---|
| १६५ - १६७.९ | ०० |
| १६८ - १७३.९ | ०१ |
| १७१ - १७३.९ | ०२ |
| १७४ - १७६.९ | ०३ |
| १७७ - १७९.९ | ०४ |
| १८० पेक्षा जास्त | ०५ |

५) पोहणे :- ( २५ मीटर ) (एकूण गुण-२०)

| वेळ (सेकंद) | गुण |
|---|---|
| ३५ किंवा कमी | २० |
| ४० | १५ |
| ४५ | १० |
| ५० | ०८ |
| ५५ | ०४ |
| ६० पेक्षा अधिक | ०० |

४. पदोन्नती :- पदोन्नतीने भरावयाच्या पदांसाठी पुढील पध्दती वापरण्यात येईल.

**(अ)** प्रत्येक वर्षी १ सप्टेंबर ते ३१ ऑगस्ट या कालावधीत प्रत्येक संवर्गात पदोन्नतीने किती पदे भरावी लागणार आहेत याचा आढावा नागपूर महानगरपालिकेतील सामान्य प्रशासन विभागातर्फे दरवर्षी जून महिन्यात आयुक्तांना सादर करतील.

**(ब)**

(१) "वर नमूद केलेल्या आढाव्यानुसार, पदोन्नतीने भरावयाच्या पदांची संख्या निश्चित झाल्यावर पदोन्नतीसाठी आवश्यक अर्हता धारण करणाऱ्या सर्व कर्मचाऱ्यांतून जेष्ठतानुक्रमाने पदांच्या संख्येच्या आयुक्त यांनी वेळोवेळी ठरवून दिलेल्या प्रमाणात कर्मचाऱ्यांच्या नावाचा विचार करण्यासाठी यादी तयार केली जाईल.

(२) ज्यांचे विरुध्द विभागीय चौकशी चालू आहे वा जे निलंबित आहेत अशा अधिकारी / कर्मचाऱ्यांची नावे जेष्ठतानुक्रमे यादीत येत असल्यास अशा यादीतून वगळण्यात येवू नयेत. तथापि त्यांच्या नावाचा विचार करतांना निवड समितीचा अभिप्राय त्यांचे नांवासमोर नोंदविला जावा.

परंतु त्यांना प्रत्यक्ष पदोन्नती देण्यापुर्वी शासनाच्या प्रचलित आदेशानुसार पुढील कार्यवाही करण्यात यावी.

(३) अशा याद्या तयार झाल्यावर दरवर्षी सर्वसाधारणपणे सप्टेंबर - ऑक्टोबर महिन्यात निवड समितीच्या बैठका आयोजित करण्यात येतील.

(४) पदोन्नतीसाठी शासनाने निश्चित केलेल्या निर्णयानुसार पदोन्नतीची निवडसुची तयार करण्यात येईल.

(५) तयार करण्यात आलेल्या निवडसूचीतील पदे जशी-जशी रिक्त होतील तशी-तशी ती भरण्याच्या कार्यवाहीसाठी ही निवडसूची वापरली जाईल व त्या निवडसूचीतील क्रमांकाप्रमाणे उमेदवारांची नियुक्ती करण्यात येईल.

(६) समितीचे सचिव बैठकांना उपस्थित राहून समिती बैठकीचा कार्यवृतांत अध्यक्षांच्या मान्यतेने तयार करतील. बैठकीसाठी तयार केलेली व सदस्यांना उपलब्ध केलेली सर्व कागदपत्रे परत घेवून ती एकत्रित करुन सांभाळून ठेवण्याची जबाबदारी समिती सचिवांची असेल.

आयुक्त
नागपूर महानगरपालिका,
नागपूर

## नागपूर महानगरपालिका नागपूर
## अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील अधिकारी / कर्मचारी
## ( वर्गीकरण, सेवाभरती व पदोन्नती)
## विनियम - २०१७
## जोडपत्र - २

नागपूर महानगरपालिका अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील (वर्गीकरण, सेवाभरती व पदोन्नती) विनियम-२०१७ च्या विनियम १९ व २० च्या तरतुदीप्रमाणे विहित केलेल्या परीक्षासंबंधीची कार्यपध्दती.

**१. विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य :-**

हे विनियम अस्तित्वात येण्याच्या तारखेस नागपूर महानगरपालिका अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागाच्या आस्थापनेवर कायमस्वरुपी सेवेत येणा-या वा त्या तारखेनंतर नियुक्त होणा-या अनुसूची “अ” मधील अधिकारी / कर्मचारी यांना विनियम १९ मध्ये नमूद केल्यानुसार नागपूर महानगरपालिका अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागाने विहीत केलेली विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य असेल.

**२. मराठी भाषा परिक्षा :-**

नागपूर महानगरपालिकेतील गट - “अ” ते “क” वर्गातील अधिकारी / कर्मचा-यांना मराठी विषयासह शालांत परीक्षा उत्तीर्ण अथवा शासनाने विहित केलेली एतदर्थ मंडळाची मराठी भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

**३. परीक्षा उत्तीर्ण होणे :-**

नागपूर महानगरपालिका अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातर्फे आयोजित केल्या जाणा-या परिक्षेसाठी पाठ्यक्रम व ती परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी लागणारे किमान गुण सक्षम प्राधिकारी वेळोवेळी ठरवतील. प्रत्येक प्रश्नपत्रिकेच्या विहित उच्चतम गुणांच्या किमान ५० टक्के गुण मिळवणे आवश्यक असेल.

**४. परिक्षेचे वेळापत्रक :-**

विभागीय परीक्षा व मराठी भाषा परीक्षा या सक्षम प्राधिकारी यांनी विहीत केलेल्या अभिकरणाकडून सर्वसाधारणपणे दरवर्षी प्रशासनाच्या / अभिकरणाच्या सोयीनुसार अशा परीक्षा मे ते जून महिन्यात घेतल्या जातील मात्र आवश्यकता भासल्यास त्यात फेरबदल करण्याचा सक्षम प्राधिकारी यांना अधिकार असेल.

**५. कालावधी व संधी :-**

**अ)** राजपत्रात प्रसिध्दीच्या दिनांकापूर्वी नियुक्त केलेल्या व्यक्तीकरिता कालावधी व संधीची संख्या :-
या नियमाच्या अधिन राहून, राजपत्राच्या प्रसिध्दीच्या दिनांकापूर्वी महानगरपालिका कर्मचारी म्हणून नियुक्त झालेल्या व सद्य:स्थितीत अस्तित्वात असलेल्या नियमान्वये परीक्षा उत्तीर्ण न झालेल्या व्यक्तीने, तीला परीक्षा उत्तीर्ण होण्यामधून या नियमातील विनियम-८ च्या तरतुदीनुसार सूट दिली दिलेली नसेल तर राजपत्राच्या प्रसिध्दीच्या दिनांकापासून ३ वर्षाच्या आत व २ संधीमध्ये परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

**ब)** या सेवाभरती नियमानुसार नियुक्त कर्मचा-यांनी त्यांची नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासून ४ वर्षात ३ संधीमध्ये विभागीय परिक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

**६. परिक्षेचा अभ्यासक्रम**

**अ)** विभागीय परिक्षेसाठी संचालक, अग्नीशमन सेवा व संचालनालय, मुंबई यांनी विहीत केल्याप्रमाणे अभ्यासक्रम असेल.

**ब)** परंतु अग्निशमन विभागातील उपस्थानक अधिकारी व त्यापेक्षा वरिष्ठ अधिका-यांसाठीच्या नागपूर अग्निशमन महाविद्यालयाकडून घेतल्या जाणा-या व अभियांत्रिकी अधिकारी महाविद्यालय, नाशिक यांचेकडून अभियांत्रिकी विभागातील अधिकारी / कर्मचा-यांसाठी विहित केलेल्या परीक्षांसाठीचा अभ्यासक्रम त्या परीक्षा घेणा-या प्राधिका-याकडून जाहीर केल्याप्रमाणे असेल.

**७.परिक्षा उत्तीर्ण न झाल्यास होणारे परिणाम :-**

एखादा कर्मचारी विनिर्दिष्ट केलेल्या कालमर्यादेत आणि संधीमध्ये परीक्षा उत्तीर्ण झाला नाही तर पुढील परिणाम होतील.

(अ) तो/ती परीक्षा उत्तीर्ण होईपर्यंत किंवा विनियम-८ मधील तरतुदीनुसार त्याला/तिला परिक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळेपर्यंत त्याला / तिला त्याच्या / तिच्या पदावर कायम करण्यात येणार नाही, किंवा त्याच्या पदाच्या वेतनमानातील पुढील वेतनवाढ त्याला देण्यात येणार नाही. अशारितीने रोखून ठेवलेली वेतनवाढ तो / ती परिक्षा उत्तीर्ण झाल्याच्या दिनांकापासून किंवा त्याला परिक्षा उत्तीर्ण होण्यामधून विनियम ८ अन्वये सूट देण्यात आल्याच्या दिनांकापासून त्याला / तिला देय असेल आणिक कोणतेही वेतनवाढ रोखून न धरल्याचे समजून पुढील सर्व वेतनवाढ देण्यात येतील. मात्र गतकाळातील थकबाकीची रक्कम अनुज्ञेय नसेल.

(आ) त्याला / तिला त्या संवर्गातील आपली ज्येष्ठता गमवावी लागेल म्हणजेच जे कर्मचारी त्याच्या अगोदर परिक्षा उत्तीर्ण झाले असतील त्या सर्व कर्मचा-यांच्या नंतर त्याचा ज्येष्ठता क्रम लागेल त्या कर्मचा-यास ज्येष्ठ असणा-या आणि त्याच्यानंतर परंतु विनियम ०५ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या कालावधीत व संधीमध्ये परीक्षा उत्तीर्ण होणा-या कर्मचा-यांच्या नंतरचा ज्येष्ठता क्रम त्याला देण्यात येईल.

**८. परिक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट :-**

(१) राजपत्राच्या दिनांकानंतर नियुक्त झालेल्या कर्मचा-यास परीक्षा उत्तीर्ण होण्यामधून पुढील बाबतीत सूट देण्यात येईल.:-

(अ) त्यास / तीस यापूर्वीच कर्मचारी म्हणून कायम करण्यात आले असेल अशा प्रकरणी किंवा

(ब) तो / ती सद्य:स्थितीत अस्तित्वात असलेल्या नियमान्वये यापूर्वीच परीक्षा उत्तीर्ण झाला असेल अशा प्रकरणी किंवा

(२) कोणत्याही दिनांकास कर्मचारी ४५ वर्ष वयाचा झाल्यानंतर त्यास परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येईल.

९. परीक्षा सर्वसाधारणपणे वर्षातून एकदा घेण्यात येईल. एखाद्या वर्षी जर कोणत्याही कारणास्तव परीक्षा घेण्यात आली नाही तर कालावधी व संधीची गणना करतांना वगळण्यात येईल.

**१०. निर्वाचनाच्या शक्ती :-**

या नियमातील तरतुदीनुसार अधिका-यांच्या / कर्मचा-यांच्या एखाद्या संवर्गास कोणती विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य आहे वा कोणत्या संवर्गास ही परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट आहे या संबंधी कोणताही विवाद उत्पन्न झाल्यास त्याबाबत शासनाचा निर्णय अंतीम राहील.

आयुक्त<br>
नागपूर महानगरपालिका,<br>
नागपूर

**नागपूर महानगरपालिका, नागपूर**

**अग्निशमन व आणिबाणी सेवा विभागातील अधिकारी/कर्मचारी (वर्गीकरण, सेवाभरती व पदोन्नती) विनियम-२०१७**

**जोडपत्र-२ , अनुसूची-अ,**

| अ.क्र | पदनाम | आकृती बंधा नुसार मंजुर पदे | नेमणुकीची पध्दत व टक्केवारी<br>१.नामनिर्देशन/ सरळसेवेने<br>२.पदोन्नती<br>३.प्रतिनियुक्ती | संचालक, अग्निशमन सेवा संचालनालय यांच्या प्रस्तावानुसार असलेले सेवाप्रवेश नियम |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मुख्य अग्निशमन अधिकारी (Chief Fire Officer) **(गट-अ)** | ०१ | १००% पदोन्नतीने (प्रथम पाच वर्षासाठी) | **अ) शैक्षणिक पात्रता**<br>(१) कोणत्याही शाखेचा पदवीधर असावा.<br>**(२)** राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांचेकडील पदवी (बी.ई.फायर) धारण केलेली असावी. **किंवा** राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांचा डिव्हीजनल फायर ऑफिसर पाठ्यक्रम (अग्निशमन अभियांत्रिकी मधील प्रगत पदविका) धारण केलेली असावी. **किंवा** दि.इन्स्टीटयुशन ऑफ फायर इंजिनिअर्स (यु.के.) किंवा (इंडिया) या संस्थेकडील सदस्यत्व (एम.आय-फायर) किंवा कोणत्याही शाखेची पदवी प्राप्त केल्यानंतर दि इन्स्टिटयुशन ऑफ फायर इंजिनिअर्स (यु.के.) यांचे सदस्यत्व असावे.<br>(३) मराठी भाषेतून प्रशासकीय कामकाज करता यावे यासाठी मराठीचे ज्ञान असणे आवश्यक आहे. (लिहिणे, वाचणे व बोलणे)<br>(४) एम.एस.सी.आय.टी परिक्षा उत्तीर्ण असावा.<br>**ब) शारीरीक पात्रता**<br>१) नामनिर्देशन : उमेदवाराचे वय वर्षे ५५ पेक्षा अधिक नसावे. प्रतिनियुक्तीवरील उमेदवाराला वयाची अट लागू नाही.<br>२) अग्निशमन सेवेत प्रशासकीय व ऑपरेशनल कामासाठी उमेदवाराची निरोगी व सुदृढ शरीरयष्टी असावी.<br>**क) अनुभव :**<br>"अ+" वर्ग महानगरपालिकेतील उपमुख्य अग्निशमन अधिकारी या पदावर किमान २ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी. **किंवा**<br>"अ" वर्ग महानगरपालिका / विशेष नियोजन प्राधिकरण/ शासकीय / निमशासकीय अग्निशमन सेवेमध्ये उपमुख्य अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी. **किंवा** "ब" व "क" वर्ग महानगरपालिका /शासकीय/ निमशासकीय अग्निशमन सेवेमध्ये मुख्य अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान २ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | **ड)पदोन्नती :**<br>उप-मुख्य अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण झालेल्या तसेच वरील शैक्षणिक व शारिरीक अर्हता धारण करणारे अधिकारी सेवा ज्येष्ठतेनुसार पदोन्नतीस पात्र. पदोन्नतीसाठी वयाची अट असणार नाही.<br>**इ) वेतन :** वेतन १५,६००-३९१०० (ग्रे.वे.६,६००) किंवा शासनाने वेळोवेळी मंजूर केलेली वेतनश्रेणी.<br>**ई) भत्ते :** (नामनिर्देशन/ प्रतिनियुक्ती/पदोन्नती)<br>ऑनकॉल पे रु.३००/- जोखीमभत्ता रु.१५०/- युनिफॉर्म अपकीप रु.२००/- |
| २ | उपमुख्य अग्निशमन अधिकारी (Deputy Chief Fire Officer) (अधि नियमातील तरतुदी नुसार) **(गट-अ)** | ०१ | १००% पदोन्नतीने (प्रथम पाच वर्षासाठी) | **नामनिर्देशन / प्रतिनियुक्ती**<br>**आ)शैक्षणिक पात्रता:**<br>(१) कोणत्याही शाखेचा पदवीधर असावा.<br>(२) राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांचेकडील पदवी (बी.ई.फायर) धारण केलेली असावी. **किंवा** राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांचा डिव्हीजनल फायर ऑफिसर पाठ्यक्रम (अग्निशमन अभियांत्रिकी मधील प्रगत पदविका) धारण केलेली असावी. **किंवा** दि.इन्स्टीटयुशन ऑफ फायर इंजिनिअर्स (यु.के.) किंवा (इंडिया) या संस्थेकडील सदस्यत्व (एम.आय-फायर) किंवा कोणत्याही शाखेची पदवी प्राप्त केल्यानंतर दि इन्स्टिटयुशन ऑफ फायर इंजिनिअर्स (यु.के.) यांचे सभासदस्यत्व असावे.<br>(३) मराठी भाषेतून प्रशासकीय कामकाज करता यावे यासाठी मराठीचे ज्ञान असणे आवश्यक आहे. (लिहिणे, वाचणे व बोलणे)<br>(४) एम.एस.सी.आय.टी परिक्षा उत्तीर्ण असावा.<br>**ब) शारिरीक पात्रता :**<br>१) नामनिर्देशन : उमेदवाराचे वय वर्षे ५० पेक्षा अधिक नसावे.<br>प्रतिनियुक्तीवरील उमेदवाराला वयाची अट लागू नाही.<br>२) अग्निशमन सेवेत प्रशासकीय व ऑपरेशनल कामासाठी उमेदवाराची निरोगी व सुदृढ शरीरयष्टी असावी.<br>**क)अनुभव :**<br>**"अ+"** वर्ग महानगरपालिकेतील विभागीय अग्निशमन अधिकारी या पदावर किमान २ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी. **किंवा** **"अ"** वर्ग महानगरपालिका / विशेष नियोजन प्राधिकरण/ शासकीय /निमशासकीय अग्निशमन सेवेमध्ये विभागीय अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी. **किंवा** "ब" व "क" वर्ग महानगरपालिका/शासकीय/निमशासकीय अग्निशमन सेवेमध्ये उपमुख्य अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान २ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी. **किंवा** "ड" वर्ग महानगरपालिका / शासकीय / निमशासकीय अग्निशमन सेवेमध्ये मुख्य अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ४ वर्ष सेवा पूर्ण केलेली असावी. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | **ड) पदोन्नती :**<br>विभागीय अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष किमान ३ वर्ष सेवा पूर्ण झालेल्या तसेच वरील शैक्षणिक पात्रता असणा-या अधिका-यांच्या सेवाजेष्ठता अधिन पात्रता या निकषावर पदोन्नतीने नियुक्ती करण्यात येईल. पदोन्नतीसाठी वयाची अट असणार नाही.<br>**इ) वेतन :** वेतन १५,६००-३९१०० (ग्रे.वे.५,४००) किंवा शासनाने वेळोवेळी मंजूर केलेली वेतनश्रेणी.<br>**ई) भत्ते :** (नामनिर्देशन/ प्रतिनियुक्ती/पदोन्नती)<br>ऑनकॉल पे रु.३००/- जोखीमभत्ता रु.१५०/- युनिफॉर्म अपकीप रु.२००/- |
| ३ | विभागीय अग्निशमन अधिकारी (Divisional Fire Officer) (अधि नियमाच्या तरतुदी नुसार) **(गट-ब)** | ०२ | १.नामनिर्देशन/ सरळसेवेने -५०%<br>२.पदोन्नती-५०%<br>(प्रथम पाच वर्षाकरिता १००% पदोन्नती) | <u>नामनिर्देशन</u><br>**अ)शैक्षणिक पात्रता:**<br>(१) कोणत्याही शाखेचा पदवीधर असावा.<br>(२) राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांचा डिव्हीजनल फायर ऑफिसर पाठ्यक्रम (अग्निशमन अभियांत्रिकी मधील प्रगत पदविका) धारण केलेली असावी. **किंवा** दि.इन्स्टीटयुशन ऑफ फायर इंजिनिअर्स (यु.के.) किंवा (इंडिया) या संस्थेकडील सदस्यत्व (एम.आय-फायर) किंवा कोणत्याही शाखेची पदवी प्राप्त केल्यानंतर दि इन्स्टिटयुशन ऑफ फायर इंजिनिअर्स (यु.के.) यांचे सदस्यत्व असावे.<br>(३) मराठीचे ज्ञान असणे आवश्यक (लिहिणे, वाचणे व बोलणे)<br>(४) एम.एस.सी.आय.टी परिक्षा उत्तीर्ण असावा.<br>**ब) अनुभव :**<br>**“अ+”** वर्ग महानगरपालिकेतील सहाय्यक विभागीय अग्निशमन अधिकारी या पदावर किमान २ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी. **किंवा** **“अ”** वर्ग महानगरपालिका / विशेष नियोजन प्राधिकरण/ शासकीय /निमशासकीय अग्निशमन सेवेमध्ये सहाय्यक विभागीय अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी. **किंवा** “ब” व “क” वर्ग महानगरपालिकेमध्ये विभागीय अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान २ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी. **किंवा** “ड” वर्ग महानगरपालिकेमध्ये मुख्य अग्निशमन अधिकारी /उपमुख्य अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान २ वर्ष सेवा पूर्ण केलेली असावी.<br>**क) वयोमर्यादा :** नामनिर्देशनाच्या उमेदवाराचे वय ४५ वर्षापेक्षा जास्त असू नये. प्रतिनियुक्तीवरील उमेदवाराला वयाची अट लागू नाही.<br>**ड) पदोन्नती :** सहाय्यक विभागीय अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष किमान ३ वर्ष सेवा पूर्ण झालेल्या तसेच वरील शैक्षणिक पात्रता असणा-या अधिका-यांच्या सेवाजेष्ठता अधिन पात्रता या निकषावर पदोन्नतीने नियुक्ती करण्यात येईल. पदोन्नतीसाठी वयाची अट असणार नाही. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | **इ) वेतन :**वेतन ९,३००-३४,८०० (ग्रे.वे.४,८००) किंवा शासनाने वेळोवेळी मंजूर केलेली वेतनश्रेणी.<br>**ई) भत्ते :** (नामनिर्देशन/ प्रतिनियुक्ती/पदोन्नती)<br>ऑनकॉल पे रु.२००/- जोखीमभत्ता रु.१५०/- युनिफॉर्म अपकीप रु.२००/- |
| ४ | सहाय्यक विभागीय अग्निशमन अधिकारी (Asstt. Divisional Fire Officer) **(गट-ब)** | ०४ | नामनिर्देशन -५०%<br>पदोन्नती - ५०% | **<u>नामनिर्देशन</u>**<br>**अ)शैक्षणिक पात्रता:**<br>(१) कोणत्याही शाखेचा पदवीधर असावा.<br>(२) राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांचा डिव्हीजनल फायर ऑफिसर पाठ्यक्रम (अग्निशमन अभियांत्रिकी मधील प्रगत पदविका) धारण केलेली असावी.<br>(३) मराठीचे ज्ञान असणे आवश्यक (लिहिणे, वाचणे व बोलणे)<br>(४) एम.एस.सी.आय.टी परिक्षा उत्तीर्ण असावा.<br>**ब) अनुभव :**<br>**"अ+"** वर्ग महानगरपालिकेतील अग्निशमन केंद्र अधिकारी या पदावर किमान २ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी. **किंवा** **"अ"** वर्ग महानगरपालिका / विशेष नियोजन प्राधिकरण/ शासकीय /निमशासकीय अग्निशमन सेवेमध्ये अग्निशमन केंद्र अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी. **किंवा** "ब" व "क" वर्ग महानगरपालिका / शासकीय / निमशासकीय अग्निशमन सेवेमध्ये सहाय्यक विभागीय अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी. **किंवा** "ड" वर्ग महानगरपालिकेमध्ये विभागीय अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ३ वर्ष सेवा पूर्ण केलेली असावी.<br>**क) वयोमर्यादा-शारीरीक पात्रता :**<br>(१) नामनिर्देशनाच्या उमेदवाराचे वय ४५ वर्षापेक्षा जास्त असू नये.<br>(२) शासकीय /निमशासकीय अग्निशमन सेवेमध्ये कार्यरत असणा-या कर्मचा-यांसाठी वयाची अट ४५ वर्षापर्यंत शिथिल राहील. प्रतिनियुक्तीवरील उमेदवाराला वयाची अट लागू नाही.<br>(३) अग्निशमन सेवेत प्रशासकीय व ऑपरेशनल कामासाठी उमेदवाराची निरोगी व सुदृढ शरीरयष्टी असावी.<br>**ड) पदोन्नती :**<br>अग्निशमन केंद्र अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ३ वर्ष सेवा पूर्ण करीत असलेल्या व उपरोक्त अर्हता प्राप्त करणा-या अधिका-यांची ज्येष्ठता अधिन पात्रता या निकषावर पदोन्नतीने नियुक्ती करण्यात येईल. जर राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांचा डिव्हीजनल फायर ऑफिसर कोर्स पूर्ण केलेला नसेल तर उमेदवारांना पदोन्नती नंतर ३ वर्षात डिव्हीजनल फायर ऑफिसर कोर्स पूर्ण करणे आवश्यक राहील. पदोन्नतीसाठी वयाची अट असणार नाही. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | **इ) वेतन :** वेतन ९,३००-३४,८०० (ग्रे.वे.४,६००) किंवा शासनाने वेळोवेळी मंजूर केलेली वेतनश्रेणी.<br>**फ) भत्ते :** (नामनिर्देशन/ प्रतिनियुक्ती/पदोन्नती)<br>ऑनकॉल पे रु.२००/- जोखीमभत्ता रु.१५०/- युनिफॉर्म अपकीप रु.२००/- |
| ५ | अग्निशमन केंद्र अधिकारी (Station Officer) **(गट-ब)** | १५ | नामनिर्देशन -५०%<br>पदोन्नती - ५०% | <u>**नामनिर्देशन**</u><br>**अ)शैक्षणिक पात्रता:**<br>(१) कोणत्याही शाखेचा पदवीधर असावा.<br>(२) राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांचा स्टेशन ऑफिसर ॲण्ड इन्स्ट्रक्टर पाठ्यक्रम (अग्निशमन अभियांत्रिकी मधील पदविका) उत्तीर्ण असावा. **किंवा** महाराष्ट्र अग्निशमन सेवा अकादमी, महाराष्ट्र शासन यांचा १ वर्ष कालावधीचा उप स्थानक अधिकारी व अग्नि प्रतिबंधक अधिकारी हा पाठ्यक्रम पूर्ण केलेला असावा. **किंवा** दि इन्स्टीटयूट ऑफ फायर इंजिनिअर्स (यु.के.) किंवा (इंडिया) या संस्थेकडून ग्रेड-आय पदवी प्राप्त केलेली असावी.<br>(३) मराठीचे ज्ञान असणे आवश्यक (लिहिणे, वाचणे व बोलणे)<br>(४) एम.एस.सी.आय.टी परिक्षा उत्तीर्ण असावा.<br>**ब) किमान शारिरीक पात्रता :**<br>(अ) उंची-१६५से.मी. (महिला उमेदवारांसाठी उंची १६२ से.मी.)<br>(ब) छाती- साधारण ८१ से.मी.-फुगवून ५ से.मी.जास्त<br>(महिला उमेदवारांसाठी लागू नाही)<br>(क) वजन- ५० कि.ग्रॅ.<br>(ख) दृष्टी - चांगली.<br>**क) अनुभव :**<br>**"अ+"** वर्ग महानगरपालिकेतील सहायक अग्निशमन केंद्र अधिकारी या पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी. **किंवा** **"अ"** वर्ग महानगरपालिका / विशेष नियोजन प्राधिकरण/ शासकीय /निमशासकीय अग्निशमन सेवेमध्ये सहाय्यक अग्निशमन केंद्र अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ४ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी. **किंवा** "ब" व "क" वर्ग महानगरपालिकामध्ये अग्निशमन सेवेमध्ये अग्निशमन केंद्र अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ३ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी. **किंवा**<br>"ड" वर्ग महानगरपालिकेमध्ये अग्निशमन केंद्र अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ४ वर्ष सेवा पूर्ण केलेली असावी.<br>**ड) वयोमर्यादा-**<br>(१) सरळसेवेच्या उमेदवाराचे वय ४० वर्षापेक्षा जास्त असू नये.<br>(२) शासकीय /निमशासकीय अग्निशमन सेवेमध्ये कार्यरत असणा-या कर्मचा-यांसाठी वयाची अट लागू राहणार नाही. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | **इ) पदोन्नती :**<br>सहाय्यक अग्निशमन केंद्र अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ३ वर्ष नियमित सेवा पूर्ण करीत असलेल्या व उपरोक्त अर्हता प्राप्त करणा-या अधिका-यांची ज्येष्ठता अधिन पात्रता या निकषावर पदोन्नतीने नियुक्ती करण्यात येईल. **जर** राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांचा स्टेशन ऑफिसर ॲण्ड इन्स्ट्रक्टर कोर्स पूर्ण केलेला नसेल तर पदोन्नती झाल्यापासून ३ वर्षात कोर्स पूर्ण करणे आवश्यक राहील. पदोन्नतीसाठी वयाची अट असणार नाही.<br>**ई) वेतन :**वेतन ९,३००-३४,८०० (ग्रे.वे.४,४००) किंवा शासनाने वेळोवेळी मंजूर केलेली वेतनश्रेणी.<br>**उ) भत्ते :** (नामनिर्देशन/ प्रतिनियुक्ती/पदोन्नती)<br>ऑनकॉल पे रु.२००/- जोखीमभत्ता रु.१५०/- युनिफॉर्म अपकीप रु.२००/- |
| ६ | सहाय्यक अग्निशमन केंद्र अधिकारी (Asstt. Station Officer) **(गट-क)** | ३९ | नामनिर्देशन -२५%<br>पदोन्नती - ७५%<br><br>(प्रथम पाच वर्षाकरिता १००% पदोन्नती) | **<u>नामनिर्देशन</u>**<br>**अ)शैक्षणिक पात्रता:**<br>(१) कोणत्याही शाखेचा पदवीधर असावा.<br>(२) राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांचा स्टेशन ऑफिसर ॲण्ड इन्स्ट्रक्टर पाठ्यक्रम (अग्निशमन अभियांत्रिकी मधील पदविका) उत्तीर्ण असावा. **किंवा** महाराष्ट्र अग्निशमन सेवा अकादमी, महाराष्ट्र शासन यांचा १ वर्ष कालावधीचा उप स्थानक अधिकारी व अग्नि प्रतिबंधक अधिकारी हा पाठ्यक्रम पूर्ण केलेला असावा. **किंवा** दि इन्स्टीटयूट ऑफ फायर इंजिनिअर्स (यु.के.) किंवा (इंडिया) या संस्थेकडून ग्रेड-आय पदवी प्राप्त केलेली असावी.<br>(३) मराठीचे ज्ञान असणे आवश्यक (लिहिणे, वाचणे व बोलणे)<br>(४) एम.एस.सी.आय.टी परिक्षा उत्तीर्ण असावा.<br>**ब) किमान शारिरीक पात्रता :**<br>(अ) उंची-१६५से.मी. (महिला उमेदवारांसाठी उंची १६२ से.मी.)<br>(ब) छाती- साधारण ८१ से.मी.-फुगवून ५ से.मी.जास्त (महिला उमेदवारांसाठी लागू नाही)<br>(ग) वजन- ५० कि.ग्रॅ.<br>(घ) दृष्टी - चांगली.<br>**क) अनुभव :**<br>**"अ"** वर्ग महानगरपालिका / महानगरपालिका / विशेष नियोजन प्राधिकरण/ शासकीय /निमशासकीय अग्निशमन सेवेमध्ये उप-अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ३ वर्ष सेवा पूर्ण केलेली असावी. **किंवा** "ब" व "क" वर्ग महानगरपालिकामध्ये उप-अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ५ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी.<br>**ड) वयोमर्यादा-**<br>(१) सरळसेवेच्या उमेदवाराचे वय ४० वर्षापेक्षा जास्त असू नये.<br>(२) शासकीय /निमशासकीय अग्निशमन सेवेमध्ये कार्यरत असणा-या कर्मचा-यांसाठी वयाची अट लागू राहणार नाही. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | **इ) पदोन्नती :**<br>उप-अग्निशमन अधिकारी या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ३ वर्ष नियमित सेवा पूर्ण करीत असलेल्या व उपरोक्त अर्हता प्राप्त करणा-या अधिका-यांची ज्येष्ठता अधिन पात्रता या निकषावर पदोन्नतीने नियुक्ती करण्यात येईल. पदोन्नतीसाठी वयाची अट असणार नाही.<br>**ई) वेतन :** वेतन ९,३००-३४,८०० (ग्रे.वे.४,३००) **किंवा** शासनाने वेळोवेळी मंजूर केलेली वेतनश्रेणी.<br>**उ) भत्ते :** (नामनिर्देशन/ प्रतिनियुक्ती/पदोन्नती)<br>ऑनकॉल पे रु.२००/- जोखीमभत्ता रु.१५०/- युनिफॉर्म अपकीप रु.२००/- |
| ७ | उप अग्निशमन अधिकारी (Sub Officer) **(गट-क)** | ३९ | नामनिर्देशन - ५०%<br>पदोन्नतीने - ५०%<br>(प्रथम ५ वर्षाकरिता १००% पदोन्तीने पदे भरण्यात येतील. यात ८० % प्रमुख अग्निशामक विमोचक व २०% चालक यंत्रचालक / जुने पदनाम आग्निक ड्रायव्हर संवर्गातून पदोन्नतीने करण्यात येईल.) | <u>नामनिर्देशन</u><br>**अ)शैक्षणिक पात्रता:**<br>(१) कोणत्याही शाखेचा पदवीधर असावा.<br>(२) राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर यांचा उप अग्निशमन अधिकारी हा पाठ्यक्रम पूर्ण केलेला असावा. **किंवा** महाराष्ट्र अग्निशमन सेवा अकादमी, महाराष्ट्र शासन यांचा १ वर्ष कालावधीचा उप स्थानक अधिकारी व अग्नि प्रतिबंधक अधिकारी हा पाठ्यक्रम पूर्ण केलेला असावा. **किंवा** दि इन्स्टीटयूट ऑफ फायर इंजिनिअर्स (यु.के.) किंवा (इंडिया) या संस्थेकडून ग्रेड-आय पदवी प्राप्त केलेली असावी.<br>(३) मराठीचे ज्ञान असणे आवश्यक (लिहिणे, वाचणे व बोलणे)<br>(४) एम.एस.सी.आय.टी परिक्षा उत्तीर्ण असावा.<br>**ब) किमान शारिरीक पात्रता :**<br>(अ) उंची-१६५से.मी. (महिला उमेदवारांसाठी उंची १६२ से.मी.)<br>(ब) छाती- साधारण ८१ से.मी.-फुगवून ५ से.मी.जास्त (महिला उमेदवारांसाठी लागू नाही)<br>(ड) वजन- ५० कि.ग्रॅ.<br>(च) दृष्टी - चांगली.<br><br>**क) अनुभव :**<br>"ब" व "क" वर्ग महानगरपालिकामध्ये प्रमुख अग्निशामक-विमोचक या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ५ वर्षे नियमित सेवा पूर्ण केलेली असावी. **किंवा** "ड" वर्ग महानगरपालिकामध्ये प्रमुख अग्निशामक-विमोचक या पदावर किंवा समकक्ष पदावर किमान ७ वर्षे सेवा पूर्ण केलेली असावी.<br>**ड) वयोमर्यादा-**<br>(१) सरळसेवेच्या उमेदवाराचे वय ३५ वर्षापेक्षा जास्त असू नये.<br>(२) शासकीय /निमशासकीय अग्निशमन सेवेमध्ये कार्यरत असणा-या कर्मचा-यांसाठी वयाची अट ४५ वर्षापर्यंत शिथिल राहील. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | **इ) पदोन्नती :**<br>प्रमुख अग्निशाम-विमोचक किंवा चालक यंत्र चालक या पदावर नियमित ३ वर्ष सेवा पूर्ण झालेल्या व वरील शैक्षणीक व शारिरीक अर्हता प्राप्त करणा-या कर्मचा-याची सेवा ज्येष्ठता अधिन पात्रता या निकषावर पदोन्नतीने नियुक्ती करण्यात येईल. पदोन्नतीसाठी वयाची अट असणार नाही.<br>**ई) वेतन :**<br>वेतन ९,३००-३४,८०० (ग्रे.वे.४,२००) किंवा शासनाने वेळोवेळी मंजूर केलेली वेतनश्रेणी.<br>**उ) भत्ते :** (नामनिर्देशन/ प्रतिनियुक्ती/पदोन्नती)<br>ऑनकॉल पे रु.२००/- जोखीमभत्ता रु.१५०/- युनिफॉर्म अपकीप रु.२००/- |
| ८ | प्रमुख अग्निशामक विमोचक (Leading Fireman Rescuer) **(गट-क)** | ८१ | नामनिर्देशन - ५०%<br>पदोन्नती - ५०%<br>(प्रथम ५ वर्षाकरिता ८०% अग्निशामक विमोचक व २०% यंत्रचालक पदोन्नतीने) | **<u>नामनिर्देशन</u>**<br>**अ)शैक्षणिक पात्रता:**<br>(१) माध्यमिक शालांत परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक.<br>(२) राष्ट्रीय अग्निशमन प्रशिक्षण केंद्र, महाराष्ट्र शासन, मुंबई यांचा ६ महिने कालावधीचा अग्निशामक प्रशिक्षण पाठक्रम पूर्ण केलेला असावा.<br>(३) मराठीचे ज्ञान असणे आवश्यक (लिहिणे, वाचणे व बोलणे)<br>(४) एम.एस.सी.आय.टी परिक्षा उत्तीर्ण असावा.<br>**ब) किमान शारिरीक पात्रता :**<br>(अ) उंची-१६५से.मी. (महिला उमेदवारांसाठी उंची १६२ से.मी.)<br>(ब) छाती- साधारण ८१ से.मी.-फुगवून ५ से.मी.जास्त (महिला उमेदवारांसाठी लागू नाही)<br>(छ) वजन- ५० कि.ग्रॅ.<br>(ज) दृष्टी - चांगली.<br>**क) अनुभव :**<br>उमेदवाराला शासकीय / निमशासकीय / महानगरपालिका / विशेष नियोजन प्राधिकरणे या संस्थामधील अग्निशमन सेवेतील अग्निशामक-विमोचक किंवा चालक-यंत्रचालक या पदावर किमान ३ वर्ष कार्य केल्याचा अनुभव असावा.<br>**ड) वयोमर्यादा-**<br>उमेदवाराचे वय ३० वर्षापेक्षा जास्त असू नये.<br>**इ) पदोन्नती :**<br>अग्निशामक-विमोचक या पदावर नियमित ३ वर्ष सेवा पूर्ण झालेल्या व वरील शैक्षणीक व शारिरीक अर्हता प्राप्त करणा-या सेवा ज्येष्ठतेनुसार पदोन्नती किंवा किमान ७ वी उत्तीर्ण असलेले व अग्निशामक-विमोचक या पदावर किमान १५ वर्ष नियमित सेवा पूर्ण केलेल्या कर्मचा-यांना सेवा ज्येष्ठतेनुसार पदोन्नती. पदोन्नतीसाठी वयाची अट असणार नाही. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | **ई) वेतन :**<br>वेतन ५,२००-२०,००० (ग्रे.वे.२,८००) किंवा शासनाने वेळोवेळी मंजूर केलेली वेतनश्रेणी.<br>**उ) भत्ते :** (नामनिर्देशन/ प्रतिनियुक्ती/पदोन्नती)<br>ऑनकॉल पे रु.१५०/- जोखीमभत्ता रु.१००/- युनिफॉर्म अपकीप रु.१५०/- |
| ९ | चालक-यंत्रचालक (Driver-Operator) **(गट-क)** | १६२ | नामनिर्देशन-७५%<br>पदोन्नती - २५% | <u>नामनिर्देशन</u><br>**अ)शैक्षणिक पात्रता:**<br>(१) माध्यमिक शालांत परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक.<br>(२) जड वाहनचालक म्हणून ३ वर्षे काम केल्याचा अनुभव असणे आवश्यक.<br>(३) वैध जड वाहन चालविण्याचा परवाना.<br>(४)) मराठीचे ज्ञान असणे आवश्यक (लिहिणे, वाचणे व बोलणे)<br>(५) राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्र, महाराष्ट्र शासन, मुंबई यांचा अग्निशामक प्रशिक्षण पाठ्यक्रम पूर्ण केलेला असल्यास प्राधान्य.<br>**ब) किमान शारिरीक पात्रता :**<br>(अ) उंची-१६५से.मी. (महिला उमेदवारांसाठी उंची १६२ से.मी.)<br>(ब) छाती- साधारण ८१ से.मी.-फुगवून ५ से.मी.जास्त (महिला उमेदवारांसाठी लागू नाही)<br>(झ) वजन- ५० कि.ग्रॅ.<br>(ञ) दृष्टी - चांगली.<br>**क) पाठयक्रम :**<br>उमेदवारांची नियुक्ती झाल्यानंतर त्यांना राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्र, महाराष्ट्र शासन, मुंबई यांचा पाठ्यक्रम पूर्ण केला नसेल तर त्या सदर प्रशिक्षण केंद्राचा ३ महिने कालावधीचा प्राथमिक अग्निशमन प्रशिक्षण पाठ्यक्रम पूर्ण करणे आवश्यक राहील.<br>**ड) वयोमर्यादा-** उमेदवाराचे वय ३० वर्षापेक्षा जास्त असू नये.<br>**इ) पदोन्नती :**<br>अग्निशामक-विमोचक किंवा वाहन चालक (अग्निशमन) या पदावर नियमित ३ वर्ष सेवा पूर्ण झालेल्या व वरील शैक्षणीक व शारिरीक अर्हता प्राप्त करणा-या सेवा ज्येष्ठतेनुसार पदोन्नती किंवा किमान ७ वी उत्तीर्ण असलेले व अग्निशामक-विमोचक किंवा वाहन चालक (अग्निशमन) या पदावर किमान १५ वर्ष नियमित सेवा पूर्ण केलेल्या कर्मचा-यांना सेवा ज्येष्ठतेनुसार पदोन्नती. पदोन्नतीसाठी वयाची अट असणार नाही.<br>**ई) वेतन :** वेतन ५,२००-२०,००० (ग्रे.वे.२,४००) किंवा शासनाने वेळोवेळी मंजूर केलेली वेतनश्रेणी. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | **उ) भत्ते :** (नामनिर्देशन/ प्रतिनियुक्ती/पदोन्नती)<br>ऑनकॉल पे रु.१५०/- जोखीमभत्ता रु.१००/- युनिफॉर्म अपकीप रु.१००/- |
| १० | वाहन चालक (अग्नि शमन) (Driver-Fire) | १० | नामनिर्देशन-१००% | <u>नामनिर्देशन</u><br>**अ)शैक्षणिक पात्रता:**<br>(१) माध्यमिक शालांत परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक.<br>(२) वाहनचालक या पदावर कमीत कमी ३ वर्षे काम केल्याचा अनुभव असणे आवश्यक.<br>(३) वैध जड वाहन चालविण्याचा परवाना.<br>(४)) मराठीचे ज्ञान असणे आवश्यक (लिहिणे, वाचणे व बोलणे)<br>(५) राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्र, महाराष्ट्र शासन, मुंबई यांचा अग्निशामक प्रशिक्षण पाठ्यक्रम पूर्ण केलेला असल्यास प्राधान्य.<br><br>**ब) किमान शारिरीक पात्रता :**<br>(अ) उंची-१६५से.मी. (महिला उमेदवारांसाठी उंची १६२ से.मी.)<br>(ब) छाती- साधारण ८१ से.मी.-फुगवून ५ से.मी.जास्त (महिला उमेदवारांसाठी लागू नाही)<br>(ट) वजन- ५० कि.ग्रॅ.<br>(ठ) दृष्टी - चांगली.<br>**क) पाठयक्रम :**<br>उमेदवारांची नियुक्ती झाल्यानंतर त्यांना राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्र, महाराष्ट्र शासन, मुंबई यांचा पाठ्यक्रम पूर्ण केला नसेल तर त्या सदर प्रशिक्षण केंद्राचा ३ महिने कालावधीचा प्राथमिक अग्निशमन प्रशिक्षण पाठ्यक्रम पूर्ण करणे आवश्यक राहील.<br>**ड) वयोमर्यादा-** उमेदवाराचे वय ३० वर्षापेक्षा जास्त असू नये.<br>**इ) वेतन :** वेतन ५,२००-२०,००० (ग्रे.वे.१,९००) **किंवा** शासनाने वेळोवेळी मंजूर केलेली वेतनश्रेणी.<br>**उ) भत्ते :** (नामनिर्देशन/ प्रतिनियुक्ती/पदोन्नती)<br>ऑनकॉल पे रु.१००/- जोखीमभत्ता रु.१००/- युनिफॉर्म अपकीप रु.१००/- |
| ११ | अग्नि शामक विमोचक (Fireman-Rescuer) | ५०० | नामनिर्देशन-१००% | **अ)नामनिर्देशन:**<br>(१) माध्यमिक शालांत परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक.<br>(२) राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्र, महाराष्ट्र शासन, मुंबई यांचा ६ महिने कालावधीचा अग्निशामक प्रशिक्षण पाठ्यक्रम उत्तीर्ण असावा.<br>(३) एमएससीआयटी परीक्षा उत्तीर्ण असावा.<br>(४) मराठीचे ज्ञान असणे आवश्यक आहे. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | **ब) किमान शारिरीक पात्रता :**<br>(अ) उंची-१६५से.मी. (महिला उमेदवारांसाठी उंची १६२ से.मी.)<br>(ब) छाती- साधारण ८१ से.मी.-फुगवून ५ से.मी.जास्त (महिला उमेदवारांसाठी लागू नाही)<br>(क) वजन- ५० कि.ग्रॅ.<br>(ड) दृष्टी - चांगली.<br>**ड) वयोमर्यादा-**<br>उमेदवाराचे वय ३० वर्षापेक्षा जास्त असू नये.<br>**इ) वेतन :** वेतन ५,२००-२०,००० (ग्रे.वे.१,९००) **किंवा** शासनाने वेळोवेळी मंजूर केलेली वेतनश्रेणी.<br>**उ) भत्ते :** (नामनिर्देशन/ प्रतिनियुक्ती/पदोन्नती)<br>ऑनकॉल पे रु.१००/- जोखीमभत्ता रु.१००/- युनिफॉर्म अपकीप रु.१००/- |
| १२ | मुख्य मेक्यानिक कम ड्रायव्हर (Mechanic cum Driver In-Charge) | ०१ | पदोन्नती- १००% | **पदोन्नती :**<br>फिटर कम ड्रायव्हर या पदावर नियमित ३ वर्ष सेवा पूर्ण झालेल्या कर्मचा-यांच्या सेवाजेष्ठता व योग्यता अधीन पात्रता या निकषावर पदोन्नतीने नियुक्ती करण्यात येईल. पदोन्नतीसाठी वयाची अट असणार नाही. |
| १३ | फिटर कम ड्रायव्हर (Fitter Cum Driver) | १५ | नामनिर्देशन-१००% | **शैक्षणिक पात्रता :**<br>१) माध्यमिक शालांत परीक्षा उत्तीर्ण असावा.<br>२) आय.टी.आय. मधील मोटर मॅक्यानिकल / डिझेल मॅक्यानिक / समकक्ष कोर्स उत्तीर्ण असावा.<br>३) जड वाहन चालविण्याचा कमीतकमी ३ वर्षाचा अनुभव असावा.<br>४) वैध जड वाहन चालविण्याचा परवाना आवश्यक.<br>५) मराठी लिहीता, वाचता व बोलता येणे आवश्यक.<br>६) एम.एस.सी.आय.टी. परीक्षा उत्तीर्ण आवश्यक.<br>७) वयोमर्यादा किमान १८ वर्ष कमाल ३३ वर्ष. आरक्षीत प्रवर्गासाठी किमान १८ वर्ष व कमाल ३८ वर्ष |
| १४ | इलेक्ट्रिशियन (Auto | ०२ | नामनिर्देशन-१००% | **शैक्षणिक पात्रता :**<br>१) माध्यमिक शालांत परीक्षा उत्तीर्ण असावा.<br>२) आय.टी.आय. मधील इलेक्ट्रीशियन / समकक्ष कोर्स उत्तीर्ण असावा. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | Electrician) | | | ३) वैध जड वाहन चालविण्याचा परवाना आवश्यक.<br>४) मराठी लिहीता, वाचता व बोलता येणे आवश्यक.<br>५) एम.एस.सी.आय.टी. परीक्षा उत्तीर्ण आवश्यक.<br>६) वयोमर्यादा किमान १८ वर्ष कमाल ३३ वर्ष. आरक्षीत प्रवर्गासाठी किमान १८ वर्ष व कमाल ३८ वर्ष |

**आयुक्त,**
**नागपूर महानगरपालिका, नागपूर.**